

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






## राष्ट्रीय पंडित बा. मा. खुपेरकरशास्त्री

# स्मृतिग्रंथ

### परिचय परामर्श : प्रा. देवदत्त दाभोलकर

यदृच्छयोपपन्नां यां वार्तां श्रुत्वा प्रमोदितः ।
बाल अेषः फलं तस्या अेतत्कूजनरूपकम् ।।१।।
आकर्ण्य भवतामग्रे मङ्गलं यत्समाहितम् ।
मधुस्मृति शतं चित्ते सुप्तजागृतमेव मे ।।२।।
सप्ततारपुरं तच्च वीथिका च प्रतापिक ।
भवदीयं गृहं तच्च प्रादुरासन् समासतः ।।३।।
मानसे स्मृतिसंव्याप्ते हृदये स्मृतिविव्हले ।
आविरासन् पुनस्तत्र ये हि नो दिवसा गताः ।।४।।
यदानन्दकरं त्यक्त्वा 'आनंदम्' मार्गसंस्थितम् ।
भवद्गेहं समाप्राप्ताः वयं विद्यापिपासवः ।।५।।
अयं मध्यगतो दीपः अेतद्विद्यार्थिमण्डलम् ।
अिमे मध्यस्थिताः यूयम् रजनीयं सुहासिनी ।।६।।
कालिदासस्तथा दण्डी बाणो भर्तृहरिस्तथा ।
भवभूतिस्तथा भासः समाहूताः समागताः ।।७।।
काव्यं व्याकरणं चैव प्रस्तुता विविधाः कथाः ।
भवद्भिः श्राव्यमाणानां ते हि नो दिवसा गताः ।।८।।
विकासं तमसाकीर्णं मन अुन्मेष समुत्सुकम् ।
भवन्तः प्रापयामासुः प्रातः पुष्पं यथा रविः ।।९।।
कुतः पुरस्तथा रात्रिः कुतस्तन्मित्रमण्डलम् ।
कुतस्तथा रसास्वादः कुतो युष्मत्समागमः ।।१०।।
कालो यातो दिना याताः यान्तु नायान्तु वा पुनः ।
स्मृतिर्मधुरमुग्धेयं हृदये विनिवेशिता ।।११।।
अस्य स्मृतिसहस्रस्य मंगला मध्यवर्तिनी ।
नन्दिनी भवतां मूर्तिः वर्धतां शरदः शतम् ।।१२।।

- **शतशः प्रणाम**
**देवदत्त दाभोलकर**
(राष्ट्रीय पंडित बा.मा. खुपेरकरशास्त्री स्मृतिग्रंथ)

या अनमोल ग्रंथाचे प्रकाशन त्यांच्या स्मृतिदिनी प्रसिद्ध करण्यात त्यांचे नातू अशोक गणेश पुरोहित यांनी मोठे औचित्य साधलेले आहे व एक अतिशय महत्त्वाचे कार्य पूर्ण केले आहे. श्री. गुरव व श्री. रेळेकर यांनी संपादनाच्या किचकट कामात त्यांना मोलाची मदत केली आहे. यासाठी आपण त्यांचे ऋणी राहिले पाहिजे. सुजाण वाचकवर्ग या ग्रंथाचे स्वागत करील यात शंका नाही.

- दे.दा.

ती. दादांचे लाडके विद्यार्थी आणि पुणे विद्यापीठाचे माजी कुलगुरू प्रा. देवदत्त दाभोलकर यांनी स्वतः या वयातही दादांचे लेख जमा करण्यात उत्साहाने भाग घेतला. ग्रंथ प्रकाशनाबद्दल त्यांची, तसेच दादांचे सहकारी प्रा. श्री. रा. पां. निपाणीकर यांची तळमळ शब्दातीत आहे. त्यांचा, तसेच शिवाजी विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. धनागरे आणि माझे कुटुंबीय यांनी या कामात दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल मी ऋणी आहे.

- **प्रकाशकाचे हृद्गत**
**अशोक गणेश पुरोहित**
(राष्ट्रीय पंडित बा.मा. खुपेरकरशास्त्री स्मृतिग्रंथ)

(पुढील मजकूर मुखपृष्ठ क्र. ३ वर)

**छपाई, कागद वगैरेंच्या वाढलेल्या खर्चामुळे 'नवभारत'ची वार्षिक वर्गणी ऑक्टोबर २००८ पासून रु. ३००/- इतकी करण्यात आलेली आहे. कृपया याची नोंद घ्यावी. वर्गणीदार आणि वाचक यांनी सहकार्य करावे अशी विनंती आहे.**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई


अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६१ । अंक १० । जुलै २००८
ज्येष्ठ/आषाढ शके १९३०
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक व प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे

**संपादक :**
श्री. मा. भावे

**संपादक मंडळ :**
वसंत पळशीकर, सुधीर रसाळ,
सीताराम रायकर, यशवंत कळमकर

**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

प्राज्ञ पाठशाळा मंडळ वाई

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियत-कालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

जुलै २००८

अनुक्रमणिका



लेखकांचा परिचय

❑ **प्रा. डॉ. चंद्रशेखर बर्वे**

स.प.महाविद्यालयात मराठीचे प्रधान प्राध्यापक (आता निवृत्त) 'तेंडुलकरांची नाटके' या विषयावर प्रबंध लेखन.

***पत्ता :*** बी. ४/३, पी. डब्ल्यू. डी. सोसायटी, रामबाग कॉलनी, नवी सदाशिव पेठ, पुणे – ४११ ०३०.

❑ **श्री. विश्वनाथ खैरे**

केंद्रीय सार्वजनिक बांधकाम खात्यातून अभियंते म्हणून निवृत्त; संस्कृत, मराठी, तामिळ या भाषांच्या आंतरसंबंधाचा विशेष अभ्यास, प्राचीन मिथ्यकथा, महाकाव्ये – पुराणे, प्राचीन भारतीय संस्कृती व परंपरा या विषयांमध्ये वैशिष्ट्यपूर्ण मौलिक लेखन; एकलव्य, युरेका, वंशाचा व्यास (नाटके), भारतीय मिथ्यांचा मागोवा, ज्ञानेश्वरांचे चमत्कार इत्यादी ग्रंथांचे कर्ते.

***पत्ता :*** ३७४, सिंध सोसायटी, पुणे – ४११ ००७.

❑ **डॉ. सुभाष आठले**

जनरल सर्जन, कोल्हापूर

***पत्ता :*** २५, नागाळा पार्क, कोल्हापूर – ४१६ ००३.



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# तेंडुलकरांची नाटके - साकल्याने विचार

प्रा० डॉ० चंद्रशेखर बर्वे

१९५५-१९८५ या तीस वर्षांत तेंडुलकरांनी पंचवीस नाटके लिहिली. तेंडुलकरांच्या नाटकांचा साकल्याने विचार या विभागात करावयाचा आहे. या विचारातून जे निष्कर्ष निघतील त्यांच्या आधारे, मराठी नाटकाच्या दृष्टीने तेंडुलकरांचे श्रेय काय, या प्रश्नाची चर्चा सुकरतेने करता येईल.

कोंडी झालेली समजुतदार स्त्री हा तेंडुलकरांच्या अनेक नाटकांचा चित्रण-विषय झालेला दिसतो- 'श्रीमंत' मधील मथुरा, 'माणूस' मधील मालू, 'मधल्या भिंती' मधील पार्वती व मंदा, 'मी जिंकलो -' मधील अनू, 'एक हट्टी मुलगी' मधील मंगला, 'शांतता-' मधील बेणारे, 'अशी पाखरे-' मधील सरू, 'गिधाडे' मधील रमा, 'सखाराम-' मधील लक्ष्मी व चंपा, 'बेबी' मधील बेबी, 'कमला' मधील कमला, 'मित्राची गोष्ट' मधील (सु)मित्रा, 'कन्यादान' मधील ज्योती यांची चित्रणे पाहण्याजोगी आहेत. या चित्रणांत तरतम करता येईल; परंतु ही स्त्री-चित्रणे तेंडुलकरांच्या नाट्यविश्वात उठून दिसणारी आहेत, यात शंका नाही. तेंडुलकरांच्या नाटकांत अशी स्त्री-चित्रणे पुष्कळ असली तरी फक्त स्त्रीदर्शन घडवण्यासाठी तेंडुलकरांची नाटके नाहीत.

मग तेंडुलकरांची नाटके कशाचे दर्शन घडवतात - घडवू पाहतात? या प्रश्नावर पुढच्या बऱ्याच प्रश्नांची उत्तरे अवलंबून असल्यामुळे त्याचे उत्तर विस्तारानेच देणे आवश्यक आहे. तेंडुलकरांना प्राधान्याने विविध मानवी संबंधांचे, मनातील गुंत्यांचे, त्यांच्या करुण-भीषण पर्यवसानांचे दर्शन अभिप्रेत आहे. मुळात प्रत्येकाची इच्छा 'माणूस' म्हणून स्वतंत्रपणे जगावे अशीच असते. तेंडुलकरांच्या नाटकातील व्यक्तिरेखांचीही इच्छा अशीच असलेली दिसते -

- "...मी मला पटलेल्या गोष्टी करू नयेत की काय? ...माणसाच्या मानानं राहायचंय मला." - मालू (माणूस नावाचे बेट)
- "जिवंत माणसांपेक्षा मातीच्या चौरस फुटांनाच किंमत आली आहे या जगात." - मालक (चिमणीचं घर होतं मेणाचं)
- "प्रथम रक्त नासतं... त्यानंतर सगळ्या अंगात जंगली जनावर रक्ताच्या तलफेनं बेचैन होऊन फिरावं, तसं होतं. माणूसपणच नष्ट होतं." रजनीनाथ (गिधाडे)
- "...आपण माणसं आहोत." सखाराम (सखाराम बाइंडर)
- "पुरुषानं काय म्हणून नाही फरफटायचं? बाईनं काय म्हणून..." (कमला)

यावरून निःशंक मनाने म्हणता येते की, अगदी पहिल्या नाटकापासून शेवटच्या नाटकापर्यंत तेंडुलकरांचे लक्ष आकृष्ट झालेले दिसते ते 'माणसा'च्या 'माणूस' म्हणून जगू पाहण्याच्या धडपडीकडे. मग ती धडपड स्त्रीची असो वा पुरुषाची असो.

प्रत्येकाचीच 'माणूस' म्हणून जगण्याची इच्छा असणे हे स्वाभाविक होय. आणि काहींची इच्छा पराकोटीची झाली म्हणजे दोन किंवा अधिक इच्छांत विरोध निर्माण होणे, झगडा सुरू होणे हे देखील अटळच होय. तेंडुलकरांनी आपल्या कित्येक नाटकांतून असा झगडा दाखवलेला आहे - 'श्रीमंत'मध्ये, माणसाला ठोकरणारी एक अहंता व शिरोधार्य मानणारी एक अहंता अशा दोन अहंतांतील टक्कर आहे. 'मधल्या भिंती'मधील लढाया पराकाष्ठेच्या आत्मप्रेमापोटीच जन्माला आलेल्या आहेत. 'मी जिंकलो' - मध्ये आप्ता-आप्तातील, जीवनविषयक दृष्टिकोनातील द्वंद्व आहे. 'एक हट्टी मुलगी' तील नाट्याचे मूळ दोन

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अस्मितांमधील झगड्यात आहे. 'सखाराम – मध्ये माणसाच्या उद्दाम अहंकाराचे व लुळ्या-पांगळ्या अहंकाराचे चित्र आहे.' 'भल्याकाका' मध्ये माणसाची भूतकाळात पोसलेली अस्मिता व त्याची वर्तमानात होणारी केविलवाणी अवस्था यांचे दर्शन आहे. अशा उदाहरणांवरून तेंडुलकरांचे लक्ष आरंभापासून आजतागायत मानवी जीवनातील मूलभूत व सनातन झगड्याकडे आकृष्ट झालेले आहे, हेच दिसून येते. हा झगडा रंगवताना, तेंडुलकर बहुधा दंभस्फोटक, उपरोधगर्भ, धारदार, बोचक शैलीचा वापर करतात, हे लक्षात घेण्याजोगे आहेच; पण वरवरच्या बोचकाऱ्यांवर ते थांबत नाहीत, तर त्या झगड्याच्या सामाजिक, कौटुंबिक, मानसिक पाळामुळांपर्यंत ते खोलवर जातात, मात्र ती प्रत्यक्षात नाटकांतून उघड करून दाखवत नाहीत, हे अधिक लक्षणीय होय.

हे लक्षात घेत असताना असे सारखे वाटते की, तेंडुलकर एखाद्या कुटुंबाच्या वा एखाद्या गटाच्या माध्यमातून मानवी जीवनातील मूलभूत व सनातन झगड्याचे दर्शन घडवत असले, तरी त्यांचा रोख त्यापलीकडे कोठेतरी आहे. बारकाईने पाहिले तर तो ध्यानात येतो– तो आहे माणसाला दुभंगून टाकणाऱ्या दुःखभोगातील अटळपणाकडे व असा अटळ दुःखभोग असूनही अढळ राहणाऱ्या माणसाच्या श्रद्धेकडे –

- "जगाच्या कारभारातली चूक काय आपण दुरुस्त करणार आहोत?" —वसंता (माणूस नावाचे बेट)
- "प्रयत्न करीत राहिलं तर केव्हा ना केव्हा फळ मिळतं माणसाला." — मालू (माणूस नावाचे बेट)
- "नाही बोलत. पण व्हायचं ते तरीसुद्धा होणार." — नाना (मधल्या भिंती)
- "देवाची दुनिया चांगली नाही." — मालक (चिमणीचं घर होतं मेणाचं)
- "देवाची दुनिया सुंदर आहे." — गोविंदा (चिमणीचं घर होतं मेणाचं)
- "हे असं होणं हेच अखेर विधिलिखित होतं." - अरुण (अशी पाखरे येती)
- "रात्री सगळीकडे देवाचं राज्य असतं. दिवसा माणसांचं असतं. उजाडलं की संपेल." - लक्ष्मी (सखाराम बाइंडर)
- "या जगात कोणी कोणाचं नशीब बदलू शकत नाही." —बेबी (बेबी)
- "कितीही खडतर आपत्तीत आशा सोडता कामा नये." — बेबी (बेबी)

यावरून मानवी भवितव्याच्या अटळपणा-कडील व ती स्वीकारणाऱ्या मानवी श्रद्धेकडील, तेंडुलकरांचा रोख स्पष्ट होतो. अलीकडच्या नाटकांतून श्रद्धेचा सूर कमी प्रमाणात-तोही कमजोर-ऐकू येतो. 'माणूस' म्हणून स्वतंत्रपणे जगू पाहणारी जिवंत माणसे, एखाद्या अचेतन होडग्यासारखी, अटळपणाच्या महापुराच्या धारेला लागलेली, तेंडुलकर शांतपणे दाखवतानाच अधिक प्रमाणात दिसतात.

येथे एक महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. प्रश्न हा की, तेंडुलकरांच्या नाटकांना अस्सल व अव्वल दर्जाच्या शोकांतिका म्हणता येईल की नाही? तेंडुलकरांना शोकांतिका पेलता येते की नाही? प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी हा प्रश्न उपस्थित केला आहे आणि त्याचे उत्तरही देऊन टाकले आहे – ..."तेंडुलकरी लेखनाचा स्थायी भाव 'करुण' हाच आहे... पण त्यांना शोकात्मिकेचा उंच दर्जा सहसा प्राप्त होत नाही."[१] १९७१ साली लिहिलेल्या लेखात प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी जे मत दिले आहे, त्यात १९७५ मध्ये मूळ लेखाला पूरणिका जोडताना बदल झालेला नाही. त्यांनी म्हटले आहे - "...येथील कारुण्य किंवा बीभत्स जीवनभाव अव्वल दर्जाच्या शोकात्मिकेत क्वचितच रूपांतर पावतो."[२] प्रा.गो.म. कुलकर्णी यांचे म्हणणे नीट तपासून घेतले पाहिजे.

वस्तुतः शोकात्मिका म्हणून तेंडुलकरांच्या नाटकांचा विचार करणे ही प्रस्तुत पुस्तकाची भूमिकाच नव्हे. असा विचार करावयाचा झाला तर त्याकरिता

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वेगळाच मांड मांडावा लागेल. प्रस्तुत पुस्तकाचा मांड मांडलेला आहे तो, नाट्य व नवता या संकल्पना समजावून घेऊन, त्यानुसार तेंडुलकरांच्या नाटकांची चिकित्सा — चर्चा करण्याकरिताच केवळ होय. शिवाय, प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी केलेली विधाने सोपपत्तिक नसून प्राय: प्रतिक्रियारूप अशीच आहेत. तेव्हा याही दृष्टीने शोकात्मिकाविषयक तात्त्विक ऊहापोह न करता, काही गृहीत धरून, गो.मं.चे म्हणणे तपासले तरी चालू शकेल.

ब्रेरटन यांचे शोकनाट्याच्या संदर्भातील म्हणणे असे – "एखाद्या आदरणीय व सहाभूतीस पात्र असलेल्या व्यक्तीचा अदृष्ट किंवा उमजू न शकलेल्या चुकीमुळे झालेला अंतिम परिणामक्षम विनाश म्हणजे शोकनाट्य. – बहुधा नियतीच्या उपरोधिकपणामुळे अंतिम विनाश अटळ होतो."[३] विनाशाच्या जोडीनेच व्ययाचाही ('वेस्ट' चाही) उल्लेख येथे केला पाहिजे.

ब्रेरटन यांनी सुचवलेला निकष तेंडुलकरांच्या नाटकांना लावला तर काय दृष्टोत्पत्तीस येते? जे येते ते असे — तेंडुलकरांच्या बहुतेक सर्व नाटकांतून कोणा ना कोणाच्या अश्राप आयुष्याचा, कशाचा ना कशाचा तरी विनाश अथवा व्यय पाहावयास मिळतो. 'माणूस–' मध्ये काशिनाथ व मालू यांच्या माफक स्वप्नांचा. 'चिमणीचं घर' मध्ये गोविंदा–कमा यांच्या वाजवी इच्छांचा. 'मी जिंकलो-' मध्ये माधवच्या स्वप्नवेडाचा, धडपडीचा. 'एक हट्टी मुलगी' मध्ये मंगलेच्या जिद्दीचा. 'शांतता-' मध्ये बेणारेच्या आंतरिक ओढीचा. 'अशी पाखरे-' मध्ये अरू-सरू यांच्या दिलजमाईचा. 'गिधाडे' मध्ये सर्वांचाच - त्यातल्या त्यात रमा–रजनीनाथ यांच्या भावजीवनाचा. 'सखाराम–' मध्ये सखारामच्या राजेपणाचा, लक्ष्मीच्या सत्त्वशीलतेचा - वरवर विजय झाल्यासारखा वाटला तरी. 'घाशीराम–' मध्ये घाशीरामच्या मूळच्या निरागसतेचा. 'भल्याकाका' मध्ये भल्याकाकाच्या अस्मितेचा, मिजाशीचा. 'बेबी' मध्ये बेबीच्या सुंदर जीवनाबद्दलच्या आकांक्षेचा. 'पाहिजे जातीचे' मध्ये तसाच, महीपती व नलिनी यांच्या आकांक्षेचा. 'दंबद्वीप' व 'भाऊ मुरारराव' यातही राजकीय नेत्यांच्या मुळातील सत्प्रवृत्तींचा. याप्रमाणे पाहावयास मिळणाऱ्या विनाशाचे, व्ययाचे रूप काही नाटकांत ('माणूस—' 'चिमणीचं घर—', 'मी जिंकलो—', 'एक हट्टी मुलगी', 'अशी पाखरे—' 'भल्याकाका', 'पाहिजे जातीचे' यांत) सौम्य आहे, तर काही नाटकांत ('शांतता—', 'गिधाडे', 'सखाराम–', 'घाशीराम–', 'बेबी', 'मित्राची गोष्ट' यांत) ते तीव्र आहे; परंतु या ना त्या रूपात तेंडुलकरांच्या बहुतेक सर्व नाटकांतून ब्रेरटनना अपेक्षित विनाश, व्यय दिसून येतो, जाणवतो, हे निश्चित.

असे असूनही प्रा. गो. म. कुलकर्णी 'येथील जीवनभाव अव्वल दर्जाच्या शोकात्मिकेत क्वचितच रूपांतर पावतो', 'त्यांना शोकात्मिकतेचा उंच दर्जा सहसा प्राप्त होत नाही', अशी विधाने करतात, तेव्हा कोड्यात पडल्यागत होते. पण थोडा विचार केल्यावर उलगडा होऊ शकतो. तो असा की, बहुधा गो. म. ग्रीक वा शेक्स्पिरिअन शोकात्मिकांच्या मापाने तेंडुलकरांच्या नाटकांना मोजत असावेत आणि म्हणून त्यांना ती नाटके अव्वल दर्जाची वाटत नसावीत. आता बदलत्या काळातील, परिस्थितीतील, स्वरूपातील साहित्याचे मूल्यमापन करताना परंपरागत निकष गृहीत धरावेत का हा खरोखर प्रश्नच आहे. विद्यमान काळातील शोकनाट्याच्या नायकासंबंधी विचार करताना केवळ ॲरिस्टॉटलप्रणीत संकेत प्रमाण मानून चालणार नाही. "गेल्या शंभर वर्षांत शोकत्मिकेच्या संकल्पनेत घडून आलेला बदल स्वीकारलाच पाहिजे."[४] असे त्या प्रश्नाचे नि:संदिग्ध उत्तर ब्रेरटन यांनी देऊन ठेवलेलेच आहे. या उत्तराशी सहमत होण्यास काहीच हरकत दिसत नाही. अशा प्रकारच्या उत्तराशी प्रा. गो. म. कुलकर्णी सहमत नसावेत! म्हणूनच वरील विधाने त्यांनी केली असावीत! तेंडुलकरांच्या नाटकात 'पॅथेटिक ड्रामा' (करुण नाट्य) अधिक आढळतो, 'ट्रॅजिक ड्रामा' (दारुण नाट्य) कमी आढळतो, असे म्हणून गो. म. थांबले असते तर एकवेळ त्यांचे म्हणणे - तेही एका मर्यादेपुरते, काही नाटकांपुरतेच - मान्य करता आले असते. परंतु ते


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दर्जाबद्दल, उंचीबद्दल बोलू लागतात, तेव्हा त्यांच्या म्हणण्याचा पुनर्विचार करणे क्रमप्राप्त ठरते.

या दृष्टीने आवश्यक तेवढा विचार वर केला आहे. याहून अधिक विचार करण्याची गरज नाही. याची दोन कारणे मागे नमूद केलीच आहेत. आणखी एक महत्त्वाचे, मुख्य कारण असे की, मुळात तेंडुलकर विशिष्ट शोकांतिका दाखविण्यासाठी उद्युक्त झालेले आहेत की काय अशीच मुळी शंका येते. मागील विभागात घेतलेल्या त्यांच्या नाटकांतील नाट्याच्या सुट्या-सुट्या दर्शनावरून व या विभागात अगोदर साकल्याने घेतलेल्या नाट्यदर्शनावरून असे म्हणावेसे वाटते की, मूलतः तेंडुलकर प्रवृत्त झालेले आहेत ते विविध मानवी संबंध, मनातील गुंते, त्यांचे पर्यवसान दाखविण्यासाठीच. हे दाखविताना त्यांनी ते कधी करुण रूपात दाखविले असेल, कधी भीषण रूपात दाखविले असेल, कधी संमिश्र रूपात दाखविले असेल, तर कधी-फार भीषण नाही, फार करुणही नाही, पण तरीदेखील-बऱ्याच गंभीर रूपात दाखविले असेल. पण म्हणून लगेच शोकात्मिकेची पुरातन पट्टी त्यांना लावणे हे कितपत औचित्यपूर्ण ठरेल?

तेंडुलकरांच्या नाटकांचा साकल्याने विचार करताना, याच ओघात आणखी एका टीकेचा विचार केला पाहिजे. प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्या लेखात जशी ही टीका आढळते, तशीच ती इतर मातब्बरांच्या लेखांतूनही आढळते. तेंडुलकरांचे मूल्यनिर्धारण करण्यापूर्वी या टीकेची दखल घ्यावयास हवी. ही टीका आहे तेंडुलकरांच्या तत्त्वान्वेषण-प्रवृत्तीविषयी.

प्रा. गो. म. कुलकर्णी यांची टीका अशी- "वास्तविक तत्त्वान्वेषण हा काही तेंडुलकरांचा प्रकृतिधर्म नव्हे."[५] प्रा. कुलकर्णी यांचे हे विधान सर्वसाधारण स्वरूपाचे आहे. श्री. प्र. श्री. नेरुरकर, डॉ. द. भि. कुलकर्णी यांनी काही विशिष्ट नाटकांपुरती विधाने केली असली तरी त्यांच्या टीकेचा रोख प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्यासारखाच आहे.[६] उलट बाजू घेणारा दुसराही पक्ष आहे. प्रा. द. ता. भोसले, प्रा. सुधीर रसाळ, श्री. धों. वि. देशपांडे. प्रा. म. वा. धोंड हे तेंडुलकरांच्या जीवनचिंतनाबद्दल अनुकूल लिहिताना दिसतात.[७]

प्रतिकूल काय किंवा अनुकूल काय, दोन्ही पक्षांतील बहुतेक जणांनी बहुधा एक-दोन नाटकांवरून सरसकट विधाने केली आहेत. कदाचित तेंडुलकरांच्या सर्व नाटकांची निरीक्षणे त्यांच्या मनात असतीलही. वस्तुस्थिती काय आहे हे स्वतंत्रपणे अवलोकन करू. तेंडुलकरांच्या नाटकांतून विखुरलेली जीवनभाष्यपर, तत्त्वज्ञानात्मक अशी काही विधाने-अवतरणे –

- '...डिगऱ्या नकोत, शहाणपण हवं, माणुसकी हवी.' केशव (श्रीमंत)
- '...या जगात अखेर कोणी कुणाचं नाही.' काशिनाथ (माणूस नावाचे बेट)
- '...ऋणानुबंध हीच एक गंमत आहे. त्यांना आरंभच नसतो आणि तरीही ते असतात.' नाना (मधल्या भिंती)
- '...खोटी आहेत नाती. अखेर नातं एक 'मी'चं नातं.' सदाशिव (मधल्या भिंती)
- '... हे कुत्र्याचं जिणं! यापेक्षा जन्माला न आलेलं चांगलं.' मालक (चिमणीचं घर होतं मेणाचं)
- '...आयुष्य ही अखेर एक सर्कस आहे. थ्री रिंग सर्कस. एका रिंगमध्ये सुख, दुसरीमध्ये दुःख आणि तिसरीत मृत्यूगोल. एकातून दुसऱ्यात, दुसऱ्यातून तिसऱ्यात सारख्या लीलेनं फिरणं एवढंच आपलं काम.' मावशी (चिमणीचं घर)
- '...वेदना मोठी सुंदर असते. माझी वेदना मला हवी. माझं 'मी' पण, ते हवं.' माधव (मी जिंकलो, मी हरलो)
- '...हे जग फार वाईट आहे.' तात्या (एक हट्टी मुलगी)
- '...हे विसाव्या शतकातील सुसंस्कृत माणसांचे अवशेष.' बेणारे (शांतता! कोर्ट चालू आहे)



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

- '...जीवन ही एक महाभयंकर गोष्ट आहे... या जीवनात फक्त एकच गोष्ट सर्वमान्य आहे - शरीर ! भावना ही हळवं होऊन बोलण्याची गोष्ट... शरीराची किळस येते आणि फार प्रेम वाटतं त्याच्याबद्दल' बेणारे (शांतता...)
- '...जगण्याचा सोपा नियम-पाशच नाहीत. त्यामुळे तकलीफ नाही.' अरू (अशी पाखरे येती)
- '...पाप-पुण्याच्या गोष्टी आहेत इतरांसाठी. ज्यांच्यावर हा शाप, त्यांना फक्त हा शाप आणि एक जळतं शरीर, जळतं मन.' रजनीनाथ (गिधाडे)
- '...बरं झालं यार, आपण कुणाचा नवरा झालो नाही. सर्व काही मिळतं. पुन्हा बांधलेले नाही.' सखाराम (सखाराम बाइंडर)
- '...सगळ्या गोष्टी नाशिवंत आहेत. मग जीव गुंतवून काय उपयोग?' सखाराम (सखाराम.)
- '...माणसं खोटी असतात आणि रांडा खऱ्या असतात.' सखाराम (सखाराम..)
- '....रात्री सगळीकडे देवाचं राज्य असतं. दिवसा माणसांचं-माणसं पापी असतात.' लक्ष्मी (सखाराम..)
- '...हा देह म्हणजे माती आहे माती, नाही शाश्वती. मरणसुद्धा मिथ्या आहे, जीवनपण मिथ्या आहे... जगणं म्हणजे नाटक, चार दिसांचे.' नाना (घाशीराम कोतवाल)
- '...जो तो आपलं नशीब बरोबर घेऊन जातो.' बेबी (बेबी)

'घरटे अमुचे छान', 'पाहिजे जातीचे', 'दंबद्वीपचा मुकाबला' या नाटकांत सामाजिक, शैक्षणिक व राजकीय व्यवहारावरील भाष्यवजा टिप्पणी आढळते.

यांसारखी विधाने म्हणजे तेंडुलकरांच्या नाटकांतर्गत जीवनचिंतनाच्या बाह्य खुणा असे म्हटले तर ते पुष्कळसे वस्तुस्थितिनिदर्शक ठरेल.

प्रत्यक्षात दिसणाऱ्या खुणांवरून ठामपणाने असे म्हणता येईल की, तेंडुलकरांचे हे जीवनचिंतन म्हणजे माणूस, त्याचे शरीर व मन, त्याचा अहंभाव, भोवतालचा गोतावळा, गोतावळ्याशी असलेल्या संबंधाची निरर्थकता, मग येणारा एकाकीपणा, पाप-पुण्याच्या कल्पना, साऱ्याची अनिश्चितता, थोडक्यात माणसाचे व्यक्तिगत सत्त्व, त्याचे सामाजिक अस्तित्व, या दोहोंतील संवादित्व-विसंवादित्व, यांविषयीचे चिंतन होय. याच विभागात उद्धृत केलेल्या अवतरणांवरून आणि गेल्या विभागात केलेल्या समालोचनावरून असे म्हणता येते की, तेंडुलकरांच्या नाटकांना-त्यांतील नाट्याला-त्यांच्या जीवनचिंतनाचा पक्का आधार आहे.

नाटकांत तात्त्विक चर्चा नसल्या तरी त्यांतील चर्चांना चिंतनाचे सबल अधिष्ठान आहे हे एकदा गृहीत धरले की, मग प्रा. गो. म. कुलकर्णी वगैरेंची प्रतिकूल टीका पटणार नाही हे उघड आहे. सर्व संदर्भ लक्षात घेता प्रा. द. ता. भोसले इत्यादिकांचे म्हणणे ग्राह्य मानणे हेच सयुक्तिक होय.

आता हे कबूल करावेच लागेल की, तेंडुलकरांच्या नाटकांतून गूढवादी चिंतनाचा, तात्त्विक स्वगतांचा आढळ सहसा होत नाही. परंतु एवढ्यावरून त्यांची नाटके चिंतनाचा पाया नसलेली या अर्थाने, बिनबुडाची ठरवणे धाडसाचेच ठरेल. पूर्वीच्या मराठी नाटकांची शब्दनिष्ठता, शब्दबहुलता यांची प्रतिक्रिया म्हणून तेंडुलकर नाटकाच्या दृश्यनिष्ठतेवर, सूचकतेवर भर देऊ पाहत आहेत. कदाचित पूर्वीच्या नाटकांतील वाचाळपणा न आवडल्यामुळे, आपल्या नाटकांतून तत्त्वज्ञानप्रचुर संवादांना, लांबलचक जडजंबाळ भाषणांना त्यांनी हद्दपार केले असेल. परिणामी तेंडुलकरांची नाटके चिंतनाचा जडभार घेऊन येताना दिसत नाहीत हे खरे. तथापि ती उथळ, पोकळ, बाष्कळ, क्षुल्लक चित्रे नाचवणारी आहेत असे चुकूनसुद्धा म्हणता येणार नाही. अर्थात तेंडुलकरांच्या नाटकांतून येणाऱ्या थोडक्या शब्दांतून शब्दांच्या पलीकडचे जाणून घ्यावयास हवे.

इतकी सगळी चर्चा केल्यावर एक प्रश्न उरतो;



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तो हा की, तत्त्वान्वेषण, चिंतन व नाट्य, नाटकाचे मूल्य यांचा खरोखर संबंध काय? तत्त्वान्वेषणाचा व नाट्याचा निकट संबंध नसला तरी नाटकाचा व त्याच्या पाठीशी असलेल्या चिंतनाचा संबंध नक्कीच असतो. म्हणजे असे की, तत्वान्वेषणामुळे नाट्य वेधक होईलच असे नाही; पण चिंतनावाचून नाटक पोचट, फोफसे राहील हे निःसंदेह! रचनातंत्रावर सारखीच हुकमत असलेल्या नाटककारांची तुलना करताना, त्यांची प्रत, त्यांचा दर्जा ठरवताना, तंत्राकडून ते ज्या नाट्यदर्शनासाठी असते, त्याच्याकडे वळावेच लागते. नाट्यदर्शनाकडे म्हणजे स्थिती-गती-आंतरक्रिया यांच्याकडे. ज्या मानाने नाटककाराला जीवनभान असेल, त्यांचे चिंतन असेल त्यामानाने त्याला स्थिती-गती-आंतरक्रिया यांचे आकलन होणार हे स्पष्ट आहे आणि या आकलनावरच नाट्यदर्शन, त्यातील प्रभावशीलत्व अवलंबून नाही का? तेंडुलकरांचे, त्यांच्या नाटकांचे प्रभावशीलत्व अजमावयाचे असेल तर त्यांच्या जीवनाकलनाची चिकित्सा-चर्चा अपरिहार्य आहे. या दृष्टीनेच आतापर्यंत काही केली आहे, आणखी पुढे करावयाची आहे.

तेंडुलकरांच्या नाटकांतून घडणारे जीवनदर्शन व त्याच्या पाठीशी असलेले जीवनचिंतन लक्षात घेऊन त्यांना विशिष्ट संप्रदायात बसवता येईल का, किंवा एखादा 'वादा'चा टिळा त्यांच्या कपाळावर लावता येईल का, असा विचार टीकाकार करू लागले तर ते साहजिकच होय. श्री. माधव मनोहर व प्रा. गो. म. कुलकर्णी या दोघांनी अशा स्वरूपाचे काही लिहिलेले सापडते. श्री. मनोहर यांनी लिहिले आहे — "इब्सेनवाद ज्याने मनोमन निःशंक स्वीकारला आहे असा एकच मराठी नाटककार आज उपलब्ध आहे. त्याचे नाव विजय तेंडुलकर."[८] मनोहरांचे हे लिहिणे तसे तेंडुलकरांच्या एका ('मधल्या भिंती') नाटकाच्या निमित्ताने आहे. प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी जे लिहिले आहे ते तेंडुलकरांच्या बहुसंख्य नाटकांचा परामर्श घेऊन मगच होय. गो. मं. चे म्हणणे असे- "तंत्रदृष्ट्या तेंडुलकरांच्या नाट्यलेखनाचा विचार करू जाता, त्यांनी इतर अनेक आधुनिक नाटककारांप्रमाणे इब्सेनप्रणीत तंत्राचाच अंगीकार केलेला आहे. आणि काल-परवापर्यंतच्या त्यांच्या नाट्यलेखनाचा बंध हाच होता."[९]

स्वतः तेंडुलकरांना मात्र आपल्याला अशी विशिष्ट संप्रदायाची/वादाची चिठ्ठी चिकटवली जावी हे मान्य नाही. श्री. विश्वनाथ मोरे यांना दिलेल्या एक मुलाखतीत त्यांनी स्पष्टपणे म्हटले आहे- "मी कुठल्याही पंथात नाही. इब्सेनपंथ स्वीकारून माझे नाट्यलेखन घडलेले नाही. या पंथाचा शास्त्रशुद्ध अभ्यास माझ्याकडून झालेला नाही. प्रामुख्याने 'प्रभात' व 'हंस' या दोन चित्रपटसंस्थांनी गाजवलेली चित्रपटसृष्टीच माझ्या नाट्यलेखनाला कितीतरी अधिक प्रमाणात उपकारक ठरली आहे."[१०] याचा अर्थ, प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे इब्सेनचे संस्कार आपल्या लेखानावर झालेले नाहीत, असे तेंडुलकरांचे म्हणणे आहे. आता अभावितपणे इब्सेननिर्मित नाट्य व तेंडुलकरनिर्मित नाट्य यांत काही ठळक/सूक्ष्म साम्य आढळते का आणि मनोहर किंवा गो. म. कुलकर्णी म्हणतात ते बरोबर ठरते का हे स्वतंत्रपणे, वस्तुनिष्ठ दृष्टीने बघितले पाहिजे.

या दृष्टीने इब्सेनच्या नाट्याची खास वैशिष्ट्ये कोणती हे प्रथम पाहू. जॉर्ज बर्नार्ड शॉ यांनी आपल्या विख्यात लेखात ही वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे नमूद केली आहेत. "पहिले-नाटकात चर्चेचा प्रवेश, तिचे प्राबल्य, इतके की, ती नाटकभर पसरावी, नाटकाच्या अंतर्यामात शिरावी आणि नाटकाने तिला आत्मसात करून टाकल्यामुळे नाटक व चर्चा एकरूपच होऊन जावीत. दुसरे-प्रेक्षकांना नाटकांतील व्यक्तिरेखांशी निगडित करून टाकल्यामुळे अटळपणे करावा लागलेला रंगमंचीय युक्त्या-प्रयुक्त्यांचा परित्याग."[११]

मराठीत इब्सेनची कोणती वैशिष्ट्ये विशेष मानली गेली याची कल्पना प्रा. श्री. ना. बनहट्टी यांच्या पुढील उताऱ्यावरून येईल. "त्याची सर्व सुप्रसिद्ध नाटके तत्कालीन सामाजिक परिस्थितीचे चित्रण करणारी आहेत. त्या काळातला मध्यम वर्ग दांभिकपणाने कसा ग्रस्त झालेला होता, याचे विदारक चित्र त्याने आपल्या





राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाटकांमधून उभे केले, आदर्शांचा आणि ध्येयवादाचा बुरखा ओढून काढून आतील स्वार्थीपणा व इंद्रियलोलुपता यांच्यावर प्रकाशाचा झोत पाडला. दांभिक संकेतांच्या दडपणाखाली सत्य आणि स्वातंत्र्य यांची कशी गळचेपी होत आहे हे त्याने दाखवले. दांभिकपणा आणि प्रतिष्ठेच्या खोट्या कल्पना यांच्या खाली दडपल्या जाणाऱ्या व्यक्ती बहुधा स्त्रिया असत. त्यांच्या मानसिक कुचंबणेच्या व्यथा इब्सेनने स्पष्ट केल्या. समाजातील व्यक्तींचे आणि त्यांच्या परस्परसंबंधांचे यथातथ्य दर्शन घडवणे हेच त्याचे प्रधान प्रयोजन होते. प्रचलित प्रश्नांची आणि तात्कालिक विषयांची मातब्बरी त्याला कधीच वाटली नाही. इब्सेनच्या नाट्यरचनेचे पहिले तत्त्व वास्तवता. सीधेपणा किंवा रोखठोकपणा हा इब्सेनच्या कलेचा दुसरा मोठा गुण. तिसरा मोठा गुण अलिप्तता. त्याची नाटके मानवी जीवनातील प्रमेये पुढे मांडतात, पण सिद्धान्त कथन करीत नाहीत, प्रमेयात्मक नाटकांचा तो आद्य प्रणेता होय."[१२] मराठी नाट्यसृष्टीच्या एका अधिकारी भाष्यकाराचे इब्सेनबद्दलचे म्हणणे हेतुतःच उद्धृत केले आहे.

प्रस्तुत पुस्तकात तंत्रदृष्टी स्वीकारलेली नसल्यामुळे, इब्सेनची, त्याच्या नाटकांची तांत्रिक वैशिष्ट्ये येथे नोंदवलेली नाहीत. तरीही शॉ वा बनहट्टी यांनी नोंदवलेल्या वैशिष्ट्यांत इब्सेन संपतो का–म्हणजे संपूर्णपणे सामावला जातो का–असा प्रश्न उपस्थित करता येईल. आणि 'ब्रांद'सारखे नाट्य निर्माण करणारा इब्सेन वरील वैशिष्ट्यांत सामावला जात नाही, असे उत्तरही देता येईल. परंतु शॉ व बनहट्टी यांनी केलेले इब्सेनी नाट्याचे वर्णन बहुतांशी बरोबर असेल तर त्याच्याशी तेंडुलकरी नाट्य किती प्रमाणात जुळते हे बघता येणे शक्य आहे. असे बघितले म्हणजे मगच, मनोहर व गो. म. कुलकर्णी तेंडुलकरांना इब्सेनच्या वळणाचे मानतात, ते बरोबर आहे की नाही, हे ठरवता येईल.

तेंडुलकरांची बहुतेक सर्व नाटके सामाजिक परिस्थितीचेच चित्रण करणारी आहेत. 'श्रीमंत', 'एक हट्टी मुलगी', 'शांतता....', 'गिधाडे', 'घाशीराम....' या नाटकांतून दंभस्फोट आढळतो. 'श्रीमंत', 'माणूस नावाचे बेट', 'मधल्या भिंती', 'मी जिंकलो...', 'एक हट्टी मुलगी', 'शांतता...', 'अशी पाखरे येती', 'गिधाडे', 'सखाराम बाइंडर', 'बेबी', 'पाहिजे जातीचे', 'कमला', 'मित्राची गोष्ट', 'कन्यादान' या नाटकांतून स्त्रीची कुचंबणा चित्रित केलेली पाहावयास मिळते. या नाटकांतून 'कारावद्ध जीवां'चे ('इम्प्रिझन्ड सोल्स'चे)[१३] दर्शन घडते.

सामाजिक परिस्थितीचे चित्रण तेंडुलकरांनी केलेले असले तरी विशिष्ट, तात्कालिक, प्रचलित प्रश्नांपुरतेच ते त्यांनी सीमित ठेवलेले नाही. सामायिक स्थितीकडून असामयिक गतीकडे व चिरकालिक आंतरक्रियेकडे जाण्याची तेंडुलकरांची प्रवृत्ती त्यांच्या बहुतेक सर्वच नाटकांतून दिसून येते. चिरकालिक आंतरक्रिया, अलिप्तता सहसा न सोडता, रोखठोकपणेच तेंडुलकर शब्दांकित करतात. –हे सगळे लक्षात घेऊन असे म्हणता येईल की, प्रा. बनहट्टी यांनी इब्सेनच्या नाटकांचे जे वळण वर्णिलेले आहे तेच वळण जवळजवळ तेंडुलकरांच्याही नाटकांचे आहे. अर्थात इब्सेनचा कित्ता पुढे ठेवून तेंडुलकरांनी ते गिरवलेले आहे असे मात्र म्हणता येणार नाही. पुष्कळदा अभावितपणे काही सारखेपणा येऊ शकतो. तसाच तो येथे आलेला असावा, असेच म्हटले पाहिजे.

इतके म्हटल्यावरही एक शंका उरतेच. शंका ही की, बनहट्टी इब्सेनी नाटकांबद्दल म्हणतात तसे तेंडुलकरी नाटकांना 'प्रमेयात्मक नाटके' म्हणता येईल का? याचबरोबर आणखीही एक शंका की, शॉने म्हटल्याप्रमाणे या नाटकांना 'चर्चाप्रवण नाटके' म्हणणे कितपत योग्य होईल? अशा काही शंका उरल्या तरी इब्सेनच्या नाटकांशी असलेले तेंडुलकरांच्या नाटकांचे साम्य नाकारता येणार नाही. हे साम्य अनुकरणातून मात्र आलेले नाही. तेव्हा माधव मनोहर व गो. म. कुलकर्णी या दोघांचाही शब्द न् शब्द पत्करला नाही तरी त्यांच्या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणण्याचा भावार्थ स्वीकारता येईल. अर्थात लगेच तेंडुलकरांना इब्सेनचा किंवा इब्सेनवादाचा टिळा लावला पाहिजे असे नाही.

किंबहुना तेंडुलकरांच्या नाटकांतून दिसणारे 'माणसा'चे चित्र, त्यातून घडणारे, मानवी संबंधांचे दर्शन पाहिल्यावर असे वाटते की, तेंडुलकरांच्या नाटकांची (बैठक संपूर्णपणे 'अस्तित्ववादी' नसली तरी त्यांची) दिशा मात्र अस्तित्ववादाचीच आहे. प्रा. गो. म. कुलकर्णी यांना हे मान्य होणारे नाही. त्यांनी स्पष्ट शब्दांत सांगून टाकले आहे– "आजच्या ललित साहित्यातून प्रादुर्भूत होऊ लागलेल्या अस्तित्ववादाशी तेंडुलकरांच्या नाट्यविश्वातील अस्तित्वसमस्येचे तसे नाते नाही."[१४] गो. मं. नी अस्तित्ववादाची सूत्रे पुरेशी स्पष्ट करून मग तेंडुलकरांच्या नाटकांबद्दलचा फैसला केलेला नाही. तेव्हा तो अखेरचा शब्द म्हणून मानता येईल की नाही हा संदेह आहेच.

हा संदेह वाढावा अशी आणखीही एक महत्त्वाची बाब आहे. ती म्हणजे तेंडुलकरनिर्मित नाट्य व अस्तिववादाच्या छटा या बाबतीतील परस्परविरुद्ध उल्लेख. हे काही वानगीदाखल– "सखाराम अस्तित्ववादी आहे," –धों. वि. देशपांडे[१५] "सखाराम अस्तित्ववादी नाही; पण त्या मार्गाकडे जाणारा आहे." –अरुण साधू.[१६] "हे (अस्तित्ववादी) तत्त्वज्ञान त्याच्या (सखारामच्या) जीवनातून उमललेले वाटत नाही." –अनिल अवचट.[१७] तेंडुलकरांच्या नाटकांबद्दल लिहिताना केले गेलेले हे उल्लेख पाहिले की, संदेह वाढतोच. या अवस्थेतून बाहेर पडण्याचा एकच मार्ग आहे. तो म्हणजे अस्तित्ववादाची प्रमुख सूत्रे समजावून घेणे आणि तेंडुलकरांच्या नाटकांतून त्यांची झलक दिसून येते का हे शोधणे, हा होय. तेंडुलकरांच्या नाटकांतील नवता ठरवण्याच्या दृष्टीने व त्यांचे श्रेय निश्चित करण्याच्या दृष्टीनेही हा शोध घेणे आवश्यकच आहे.

अस्तित्ववादाबद्दल आजवर अनेक तत्त्ववेत्त्यांकडून - तेही पुष्कळदा क्लिष्ट इंग्रजीतून–इतके लिहिले गेले आहे की, तत्त्वज्ञानाचा अभ्यासक नसलेल्या कोणाही जाणत्या व्यक्तीससुद्धा सारे मुळातून समजावून घेणे हे अत्यंत अवघड जावे. अशा स्थितीत, अस्तित्वावादाबद्दल, इंग्रजीतील तत्त्वनिरूपण शक्यतो आत्मसात करून घेऊन, त्यातल्या त्यात सुबोध रीतीने, मराठीतून जे लिहिले गेले आहे, त्याचा आधार घेण्यावाचून अन्य कोणताही पर्याय नाही. तेव्हा प्रा. दि. के. बेडेकर, श्री. विश्वास पाटील, प्रा. डॉ. रा. शं. वाळिंबे या विद्वानांच्या आधाराने अस्तित्ववादी तत्त्वज्ञान समजावून घेण्याचा प्रयत्न करू.

प्रा. दि. के. बेडेकर – "अस्तित्ववादी दर्शन माणसालाच आपंगणारे आहे. व्याकुळलेला माणूस पाहून या दर्शनाचा उदय झाला आहे. अस्मितेचा प्रत्यय माणसाला संदर्भरहित रीतीने येऊ शकतो. हे अस्तित्ववादी मीमांसेचे प्राणभूत सूत्र आहे. एखादी व्यवस्था स्वीकारली म्हणजे माणसाचा प्रत्यय त्या व्यवस्थेच्या कोंडीत रुद्ध होतो, विपर्यस्त होतो. कादंबरीचा नायक व्यवस्थेच्या पाशात न गुरफटता आपले जीवन जगतो आणि या जगण्याचा प्रत्यय घेत राहतो. किंवा व्यवस्थेच्या पाशात न कळत गुरफटणारा नायक शेवटी व्यवस्थेच्या भ्रमातून मोकळा होतो आणि 'अस्मि' या निर्भेळ, निरागस प्रत्ययापर्यंत पोचतो, असे अस्तित्ववादी कादंबऱ्यांतनू दाखवलेले असते."[१८]

श्री. विश्वास पाटील– "कायम किंवा अंतिम स्वरूपाचा 'मी' अस्तित्ववादी तत्त्वज्ञानात गृहीत धरला जात नाही. 'मी' सतत घडतच असतो. सार्त्र मनुष्याची व्याख्या, 'आता तो जे आहे ते नसणारा व आता तो जे नाही ते असणारा प्राणी म्हणजे मनुष्य', अशी करतो."[१९] ...आधुनिक व्यक्तिक जीवनाचा स्थायिभाव जीवनाविषयी अरुची, तिटकारा, उबग व कंटाळा आहे. या परिस्थितीमधून यशस्वीपणे जो बाहेर पडू शकतो व जो अधिक उत्कट जीवनवादी बनतो तो आजचा पुरुषश्रेष्ठ. अस्तित्ववादी नायकाला नेमके तेच माहीत नसते. तो संभ्रमित असतो; प्रत्येक बाबतीत तो द्विधाचित्त असतो, तो अनिश्चयी असतो, कृतिशून्य बनलेला असतो. तो आत्मसंघर्षात ओढला गेलेला असतो, त्याचे

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्यक्तिमत्त्व आत्मविभाजित असते."[११अ]

"सार्त्रने हाताळलेली मानवी जीवनाच्या वैयर्थ्याची दुसरी बाजू अल्बेर काम्यूने हाताळली आहे. काम्यूचा दृष्टिकोन 'ॲब्सर्ड'च्या तत्त्वज्ञानात मोडतो. हे तत्त्वज्ञान अस्तित्ववादाचे अंग असले तरी अस्तित्ववादाचे तत्त्वज्ञान ॲब्सर्डच्या तत्त्वज्ञानाशी संपत नाही... ॲब्सर्डिटीचा अनुभव चार प्रकारे येतो–यांत्रिक जीवनाची शोकांतिका, मृत्यूच्या अटळपणाची जाणीव, निराधारपणाची तीव्र जाणीव, इतरांपासून दुराव्याची व स्वतःच्या एकटेपणाची अनुभूती. माणसांची गर्दी वाढत असतानाच व्यक्तीचा एकटेपणा वाढत जाणे हा ॲब्सर्डिटीचा परिणाम आहे."[११आ] ..."आधुनिक उद्योग-प्रधान समाजातील माणसाला वेढून राहिलेली आत्म-दुराव्याची भावना ही अस्तित्ववादातील मध्यवर्ती समस्या आहे. आत्मदुराव्याच्या तत्त्वाप्रमाणेच अस्तित्ववादाच्या मुळाशी मानवी अस्तित्वाला व्यापून राहिलेली धास्तीची, चिंतेची, एकाकीपणाची, आशयहीनतेची भावना आहे. रितेपणाचा अनुभव येतो तो आपण, स्वतःच्या वा इतरांच्या आयुष्याचे काहीच सार्थक करू शकत नाही, या स्वतःच्या दुबळेपणाच्या अनुभूतीतून. जीवनातील रितेपणामुळे व अर्थशून्यतेमुळे मनावर चिंतेचे सावट येऊ लागते. चिंतेबरोबर हताशपणाही वाढू लागतो. वैयर्थ्याला माणसे बळी पडतात. अंगातील सुप्त शक्तीचा कोंडमारा होतो. परिणामी भावनिक व वैचारिक खुजेपणा तरी येतो अथवा माणूस कोणत्या तरी हिंसक व दहशतवादी सत्तावादाच्या आहारी जातो."[११इ]

प्रा. डॉ. रा. शं. वाळिंबे – "इहलोकी जन्म घ्यावा लागत असल्यामुळे नित्य अपराधीपणाची खंत; आयुष्य हे महापातक आहे या विचाराची न संपणारी टोचणी; आयुष्य पूर्णपणे निरर्थक आहे या भावनेच्या तीव्रतेने, अपरिहार्यपणे उत्पन्न झालेला कंटाळवाणेपणा; आत्यंतिक नैराश्य; भयग्रस्त अवस्थेत सतत राहावे लागल्यामुळे मज्जातंतूंवर पडणारा विलक्षण ताण; आणि विलक्षण एकाकीपणा इत्यादी गोष्टींचे युगपत्सत्त्व (सायमल्टेनियस एक्झिस्टन्स) म्हणजे सत्ताऽद्वैतवाद (अस्तित्ववाद), असे वर्णन केले तर त्यात कसलीही अतिशयोक्ती नाही. सर्वशून्य संवेदन ही या वादाची तार्किक परिणती आहे. श्रद्धा, आस्तिक्यबुद्धी, अतींद्रियार्थ, नीती, शाश्वत मूल्ये इत्यादी सारी तत्त्वे या वादाच्या दृष्टीने 'ॲब्सर्ड' (तर्कहीन व हास्यास्पद) आहेत. या अतिरेकी सिद्धान्तांमुळे त्यांना (हा वाद मानणाऱ्यांना) मानवी जीवन अर्थशून्य वाटते."[२०] डॉ. वाळिंबे यांनी काढलेले अस्तित्ववादाचे (अर्थात त्याच्या अ–भावात्मक अंगाचे) हे सार होय.

आतापर्यंत, काही अधिकारी विद्वानांच्या आधाराने, अस्तित्ववादी तत्त्वज्ञानाचे पर्यालोचन केले. अर्थात तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने नव्हे, तर साहित्याच्या दृष्टीने यातून काही महत्त्वाची सूत्रे हाती येतात. ती अशी –(१) परिवर्तनशील 'मी' व 'मीपणा'चे संदर्भरहित भान यांचे केन्द्रवर्तित्व, (२) आत्मलाभाच्या अभावी संभ्रम, संदेह, शेवटी आत्मसंघर्ष यांचे वर्चस्व, (३) आप्तस्वकीयांत असूनही वाट्याला येणारा एकाकीपणा, अखेरीस आत्मदुरावा यांचे प्राबल्य, (४) यातून सुरू होणारे, भयग्रस्त, त्रस्त, अस्वस्थ करून टाकणारे, धास्ती, चिंता यांचे थैमान, (५) आयुष्याच्या, एकूणच जीवनाच्या ॲब्सर्डिटीचे–अर्थशून्यतेचे–चरचरीत प्रत्यंतर, (६) परिणामी, भयंकर प्रतिक्रिया म्हणून, आत्यंतिक कोंझेपणा अथवा अतिरेकी आक्रस्ताळेपणा यांचे मोकाट आक्रमण. ही किंवा यांपैकी काही सूत्रे, त्यांची थोडी झलक तेंडुलकरांच्या नाटकांतून दिसून येते का हे यापुढे पाहू.

'मी', 'मीपणा' या भोवती तेंडुलकरांच्या नाटकांतील व्यक्तिरेखा कशा फिरतात हे दाखवून दिलेलेच आहे. 'मी'- प्रेमामुळे स्वेतरांशी व स्वतःशीही झगडा कसा सुरू होतो, नाती कशी बकलादू ठरतात, माणूस कसा एकटा पडतो, हे देखील गेल्या विभागात विस्ताराने व या विभागात संक्षेपाने दर्शविलेले आहेच. तेंडुलकरांच्या नाटकांतून, चिंताग्रस्त करणारा, खचवून–पिचवून टाकणारा नियतीचा अटळपणा व मानवी



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रयत्नांचा फोलपणा (तरी धुगधुगी धरून राहिलेली श्रद्धा--हे विशेष व वेगळेही) यांचे दर्शन कसे घडते ते मागे ओघात व येथे स्वतंत्रपणे दाखवलेलेच आहे. प्रतिक्रिया म्हणून येणारा कोंझेपणा व आक्रस्ताळेपणा कसे दिसतात ते सुद्धा (मागील विभागात) अनुक्रमे 'मधल्या भिंती', 'शांतता–', 'गिधाडे' व 'सखाराम....' या नाटकांच्या समालोचनातून पाहिलेले आहेच. यावरून असे निःशंक मनाने म्हणता येईल की, तेंडुलकरांच्या नाटकांतून अस्तित्ववादी सूत्रांची झलक किती तरी ठिकाणी दिसून येते. तेंडुलकरांनी टिपलेल्या मानवी जीवनातील स्थिती–गती–आंतरक्रियांची दिशा अस्तित्ववाद हीच आहे हे अगदी निःसंशय!

एवढ्यावरून ताबडतोब तेंडुलकरांच्या नाटकांची बैठक सर्वस्वी अस्तित्ववादाचीच आहे असे म्हणून मोकळे होण्याची घाई करून चालणार नाही. उलट सावकाशीने त्यांच्या काही नाटकांची फेरतपासणी करून मगच अंतिम निर्णय घेणे हेच अधिक इष्ट होय. या दृष्टीने प्रथम 'मधल्या भिंती' या नाटकाची फेरतपासणी करून पाहू. या नाटकातील अंतःकरणाच्या लढाया या पराकोटीच्या आत्मप्रेमापोटी जन्माला आलेल्या आहेत. पार्वतीबाई आपली इच्छा लाथाडली गेली म्हणून कष्टी तर सदाशिव आपल्यावर दुसऱ्या कोणाची इच्छा लादली गेली म्हणून दुःखी! याचा अर्थ, दोघांनाही आपला 'मी' मुक्तपणे प्रकट व्हावा असे उत्कटत्वाने, तीव्रतेने वाटते, हाच होय. अर्थात ते अशक्य होते, तेव्हा कमालीचा वैताग येतो. यावरून असे म्हणता येईल की, 'मधल्या भिंती' हे आपल्या 'मी'– च्या प्रकटीकरणासाठी, प्रस्थापनेसाठी, प्रभुत्वासाठी झालेल्या झटापटीचे नाटक आहे. "अखेर नातं एक – 'मी'-चं नातं" हे सदाशिवाचे उद्गार म्हणजे 'मधल्या भिंती'च्या मूलस्वरूपाचे निर्देशकच!

'मधल्या भिंती'त तेंडुलकरांच्या अस्तित्ववादी पदन्यासाची चाहूल लागते तर 'शांतता...' मध्ये स्पष्ट पदरव ऐकू येतो. हे नाटक फक्त बेणारेच्या घेरल्या जाण्याचे किंवा घेरल्या गेलेल्या बेणारेचे नाटक नाही. खरोखर त्यातील नाट्य, व्यक्तीच्या सामाजिक अस्तित्वाकडून तिचे व्यक्तिगत सत्त्व कोंडले जाते, या घटनेतून उद्‌भवलेले आहे. बेणारे आपला 'मी' मुक्तपणे, अनिबंध रीतीने व्यक्त करू पाहते; आणि शेवटी त्याची मुस्कटदाबी, गळचेपी होते. "जीवन म्हणजे काहीच नाही असं काही तरी आहे किंवा काही तरीच आहे असं काहीच नाही" हे बेणारेचे वेडगळ वाटणारे उद्‌गार म्हणजे मानवी अस्तित्वाच्या 'नथिंगनेस'वरील भाष्यच नव्हे काय? "आता तो जे आहे ते नसणारा व आता तो जे नाही ते असणारा प्राणी म्हणजे मनुष्यप्राणी" या सार्त्रच्या विरोधाभासात्मक वाक्याशी असणारे बेणारेच्या वरील वाक्याचे–त्याच्या विरोधाभासात्मक रचनेचे–साम्य मोठे सूचक वाटते.

'शांतता....'मधील तेंडुलकरांचा अस्तित्ववादी पदरव 'सखाराम....' मध्ये अगदी भरदार झाल्याचे लक्षात येते. सखारामचा 'मी' उद्दामपणे प्रकट होऊ पाहतो. तो स्वतःला कशालाही बांधून घ्यावयास तयार नाही. लक्ष्मीच्या प्रभावामुळे सखारामात अंतःसंघर्ष सुरू होतो - शरीरनिष्ठ 'मी' व अशरीरनिष्ठ 'मी' यांच्यांतील संघर्ष. परिणामी, पतंग हरवलेल्या मांज्यासारखा स्वत्त्व गमावून बसलेला सखाराम दिसतो–ताठपणाच्या अभावी केविलवाणा! आपण आपल्याला हरवून जात आहोत हे कळून चुकल्यावर सखाराम सैरभैर होतो, धास्तावतो. अखेरीस त्याचे जिवंत मढे निर्जीव धिंगाणा घालून थंड पडते. अस्तित्ववादी सूत्रांचा कित्ता पुढे ठेवून तेंडुलकरांनी सखाराम चितारलेला नाही, परंतु तो असा चितारला आहे की, त्याच्यात अस्तित्ववादी छटा सापडाव्यात. तेंडुलकरांचा सखाराम अनघड असल्यामुळे त्यांचे 'सखाराम...' हे नाटकही ओबडधोबड वाटते; पण ते अस्तित्ववादी खुणा घेऊन सामोरे येते हे नक्की!

वरील तपासणीच्या आधारे असा निष्कर्ष काढता येईल की, तेंडुलकरांच्या काही नाटकांची बैठक अस्तित्ववादाची असली तरी सर्वच नाटकांची आहे असे नाही; सर्व नाटकांची नसली तरी बऱ्याचशा नाटकांतून

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

पुसट खुणा सापडतात हेही खरे. परंतु अस्तित्ववादी नाट्याचे पूर्ण दर्शन तेंडुलकरांच्या नाटकांतून घडते असे म्हणता येणार नाही. तथापि मानवी अस्तित्वाने तेंडुलकरांचा कोठे तरी खोलवर वेध घेतला आहे, त्यांना अंतर्मुख-चिंतनप्रवण बनवले आहे, हे मात्र क्षणार्धात कळून चुकते. एकंदरीत अशी वस्तुस्थिती असल्यामुळे अंतिम निर्णय जपूनच घ्यावयास हवा. एवढे म्हटल्यावर, या चर्चेच्या सुरुवातीस ज्या परस्परविरोधी टीकाकारांचा उल्लेख केलेला आहे त्यांना वेगळे उत्तर द्यावयास हवे काय?

अस्तित्ववाद हे स्वतंत्र, स्वायत्त कला/साहित्य/नाट्य-मूल्य नाही. तरीही तेंडुलकरांच्या नाटकांचे वेगळेपण व नवेपण निश्चित करताना, मराठी नाटकाच्या दृष्टीने त्यांचे श्रेय ठरवताना उपयोग होऊ शकेल, म्हणूनच आतापर्यंत सारा ऊहापोह केला. तेंडुलकरांच्या नाटकांना एखादी वर्गीय मर्यादा पडलेली आहे की काय, या प्रश्नाची चर्चा करतानाही त्याचा बराच उपयोग होऊ शकेल. आता याच प्रश्नाकडे वळू.

प्रा. गो. म. कुलकर्णी यांनी तेंडुलकरांच्या नाटकांची मर्यादा पुढीलप्रमाणे नमूद केली आहे - "सदाशिवपेठी किंवा गिरगावी कुटुंबसंस्था या नाट्याशयाच्या केन्द्रस्थानी आहे. या नाट्यसृष्टीत इतर सामाजिक स्तरांतील पात्रे जवळजवळ नाहीतच; आपल्या परीने हे जग कोषबद्ध आहे. (या जगातील) ही माणसे दबलेल्या, पिचलेल्या अवस्थेत जीवन कंठत असतात. या दबलेपणातून निर्माण झालेले दुबळे, तेढे, कडवट, करुण सूर तेंडुलकरांच्या नाट्यसृष्टीत पुनःपुन्हा उमटत राहतात."[१२] याचा परामर्श घेणे क्रमप्राप्त आहे.

तेंडुलकर आता मध्यमवर्गाच्या बाहेर आलेले दिसतात. 'गिधाडे'मध्ये त्यांनी ते वर्गीय घरटे मोडून-तोडून टाकलेले आहे. 'सखाराम...'मध्ये, 'बेबी'-मध्ये व आता 'पाहिजे जातीचे' मध्येही ते उच्चस्तरावरून निम्नस्तरावर उतरले आहेत. 'घाशीराम'मध्ये ते वर्तमानाकडून गतकाळाकडे गेले आहेत आणि कुटुंबाऐवजी एका समाजतुकड्याचाच छेद त्यांनी घेतला आहे. 'दंबद्वीप' व 'भाऊ मुरारराव' यांत ते राजकीय गोटात शिरले आहेत. 'भल्याकाका' व 'भाऊ मुरारराव' यांत त्यांनी मनोव्यापारांत सूर मारला आहे. तेव्हा आता तरी तेंडुलकरांच्या नाटकांना वर्गीय मर्यादा पडलेली आहे असे धाडकन म्हणता येण्याजोगी परिस्थिती उरलेली नाही. 'कमला', त्याहीपेक्षा 'कन्यादान' हे एका प्रकारे मर्यादेचे उल्लंघनच होय.

असे म्हणणे म्हणजे तेंडुलकरांचा बचाव करणे होय असे कदाचित कोणी म्हणेल. कारण, पहिल्यांदा तेंडुलकर प्रामुख्याने मध्यमवर्गाच्या रिंगणात फिरत होते आणि बहुधा सुरुवातीच्याच नाटकांना अनुलक्षून गो. म. कुलकर्णी यांनी वरील विधाने केलेली असावीत. अर्थातच पहिल्या फेरीत तरी गो. मं. चे म्हणणे बरोबरच ठरेल. परंतु खरा प्रश्न असा आहे की विशिष्ट वर्गाच्या रिंगणात तेंडुलकर फिरत राहिले असले तरी तो वर्ग हेच केवळ त्यांचे लक्ष्य होते काय किंवा असते काय? असे ठामपणे म्हणता येईल की, विशिष्ट वर्ग एवढेच फक्त तेंडुलकरांचे लक्ष्य नाही. 'माणूस', त्याचे 'माणूस' म्हणून जगू पाहणे, या धडपडीतून इतरांशी होणाऱ्या झटापटी, त्यांतून उघडे पडणारे मानवी संबंध, त्या संबंधांची फलश्रुती हे खरोखर तेंडुलकरांचे लक्ष्य आहे. 'एकच प्याला'त गडकरी जसे समाजाच्या वर्तुळातून त्यातील एका कुटुंबाच्या छोट्या वर्तुळात शिरतात आणि तेथील दुःखाचे दर्शन घडवता घडवता एकदम मानवी जीवनाच्या व्यापक, विशाल वर्तुळात प्रवेश करतात, तसेच तेंडुलकरही विशिष्ट वर्गाच्या जगण्या-मरण्याच्या विशिष्ट प्रश्नातून एकूण मानवी अस्तित्वविषयक मूळ प्रश्नालाच थेट भिडतात, निदान भिडू पाहतात. तेव्हा गो. म. कुलकर्णी यांचे म्हणणे बरोबर ठरेल का ही शंकाच वाटते.

हरिभाऊ आपटे यांच्या कादंबऱ्यांना ज्ञानकोशकार डॉ. केतकर यांनी 'सदाशिवपेठी' असे म्हणून त्यांचा अधिक्षेप केला. त्याच थाटात, पण अधिक्षेपाचा सूर वगळून, गो. म. हे तेंडुलकरांच्या नाटकांना 'सदाशिव पेठी' किंवा 'गिरगावी' म्हणत

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहेत. तसे पाहिले तर सदाशिव पेठ ही हरिभाऊंची खरी मर्यादा नव्हतीच. वेगळे जग पाहता न येणे, ही त्यांची खरी मर्यादा नसून, जीवनाकडे वेगळ्या पातळीवरून, वेगळ्या कोनातून पाहता न येणे, ही त्यांची खरी मर्यादा होती. त्यामुळे सदाशिव पेठेऐवजी कामाठीपुरा त्यांनी बघितला असता तरी त्यांची कादंबरी फारशी वेगळी झालीच असती असे खात्रीने म्हणवत नाही. हरिभाऊंच्या नेमके उलट तेंडुलकरांचे आहे असे आवर्जून म्हणावेसे वाटते. एक तर ते आता विशिष्ट रिंगण सोडून बाहेर आले आहेतच; परंतु जेव्हा ते त्या रिंगणातच फिरत होते तेव्हा देखील त्यांनी जीवन विशिष्टवर्गीय दृष्टीने पाहिले नाही. विशिष्ट वर्गाच्या माध्यमातून, पण तेवढ्यापुरतेच नव्हे, तर एकंदरीत मानवी जीवन, माणसाचे मूळ अस्तित्वच पाहणारी, व्यापक अशीच तेंडुलकरांची दृष्टी आहे. कधी काळी वर्गीय मर्यादा असली तरी दृष्टीची मर्यादा नाही. आता तर वर्गीय मर्यादाही राहिलेली नाही.

असे असल्यामुळेच गो. म. कुलकर्णी यांच्याप्रमाणे तेंडुलकरांची मर्यादा मानता येणार नाही. याचा अर्थ तेंडुलकर असीम आहेत किंवा त्यांचे नाट्य निरपवाद आनंदच देणारे आहे, असा मुळीच नव्हे. परंतु तेंडुलकरांची मर्यादा सांगण्यापूर्वी त्यांना जास्तीत जास्त जाणून घेणे आवश्यक होय. याच भूमिकेतून आतापर्यंत काही विवेचन केले आहे आणि आणखी थोडे यापुढे करावयाचे आहे.

पुन्हा एकदा प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्याच एका विधानाकडे वळणे भाग आहे. ते विधान असे– "तेंडुलकर आपल्या नाटकांचा परीघ एवढा निरुंद का ठेवतात? ठरावीक पद्धतीचाच जीवनाशय ते पुनःपुन्हा घोळवीत, घुसळीत का राहतात? हा जीवनाशय व्यक्तिशः त्यांना जवळचा वाटत असेल, पण त्यांनी या आवर्तातच भ्रमावे का? त्यांची दृष्टी पृष्ठभागावरच का तरंगते?"[२२] प्रा. कुलकर्णी यांनी आपले असमाधान या प्रश्नांतून सौम्यपणे व्यक्त केले आहे. याच्या उलट श्री. दीनानाथ लाटे यांनी आपले असमाधान तीव्रपणे (व कुत्सितपणेही) व्यक्त केलेले दिसते– "तेंडुलकरही वेड्याप्रमाणे ठरावीक दुःखे, यातना, अन्याय चिवडत बसलेले दिसतात. यापलीकडे त्यांना अन्य कशात रस वाटत नाही. पलीकडे ते जाऊ शकणार नाहीत. ती त्यांची कुवत नाही."[२३] निर्दालनासाठी अवतार घेतल्याच्या थाटात लिहिणाऱ्या लाट्यांनी असे लिहिले तर त्यात नवल नाही. पण आकलनाच्या हेतूने उद्युक्त झालेल्या गो. मं.नीही वरच्यासारखी विधाने करावी याचे मात्र जरूर नवल वाटते. असो. तेंडुलकर खरेच आवर्तात भ्रमतात का? पृष्ठभागावरच तरंगतात का? ठरावीकच चितारतात का? खोलात उतरून, तळापर्यंत जाऊन सूक्ष्मपणे पाहून मगच उत्तर देणे योग्य!

उत्तर देता येईल ते असे– श्रीमती इंदिरा संत आपल्या कवितांतून ज्याप्रमाणे वियोगदुःखाच्या केंद्राला वेगवेगळ्या बाजूंनी भिडू बघतात, त्याचा वेगवेगळ्या कोनांतून वेध घेऊ पाहतात, त्याप्रमाणेच तेंडुलकरही आपल्या नाटकांतून मानवी अस्तित्वाविषयीच्या, मूळ पीळ पाडणाऱ्या प्रश्नालाच भिन्न भिन्न दिशांनी भिडू पाहतात. त्याचा भिन्न भिन्न बाजूंनी वेध घेऊ बघतात. गडकरी आपल्या नाटकांतून प्रेमाच्या अनेक परी दाखवतात, एक विशाल पट (पॅनोरमा) उभा करतात, असेच तेंडुलकरदेखील आपल्या नाटकांतून अस्तित्व–समस्येने त्रस्त झालेल्या माणसांच्या अनेक तऱ्हा दाखवतात, सर्व मिळून एक भला थोरला पट उभा करतात. असे असताना प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्याप्रमाणे, किंवा श्री. दीनानाथ लाटे यांच्याप्रमाणेही, प्रश्नांची फैर झाडण्याऐवजी, तेंडुलकरांच्या नाटकांचा आवाका लक्षात घेता येतो का, असे पाहणेच इष्ट ठरेल.

याच ओघात तेंडुलकरांच्या मर्यादा सूचित करणारा आणखी एक आक्षेप विचारात घ्यावयास हवा. हा आक्षेप मुळामध्ये श्रीमती लता वासडीकर यांच्या तेंडुलकरांच्या एकांकिकांवरील एका लेखात सूचित झालेला आहे. वासडीकर यांचे म्हणणे पुढीलप्रमाणे– "त्यांच्या नाट्यप्रतिभेचे खरे सामर्थ्य एकांकिका वाचत असतानाच जाणवते. एकांकिकेचे रूप घेताना नाट्यानुभूती ताणली जात नाही. तिचे नेटके स्वरूप





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एकांकिकेच्या आटोपशीर, बंदिस्त जगात व्यक्त होते."[१४] म्हणजे, नाटकांतून तेंडुलकर आपली अनुभूती ताणतात, त्यामुळे ती पसरटपणे व्यक्त होते, असेच वासडीकर यांना म्हणावयाचे आहे. तेंडुलकरांच्या एकांकिकांपुरते त्यांचे म्हणणे बिनचूक आहे. नाटकाच्या बाबतीत तसे ते आहे की नाही हे पारखून पाहिले पाहिजे. असे पाहावयाचे म्हणजे दोन प्रश्न सोडवावयाचे – (१) तेंडुलकरांचा अनुभवच मुळात तोकडा असतो का? (२) त्यांचे अनेक अंकी नाटक बनवताना ते स्वतःच तोकडे पडतात का? आणि आपला तोकडेपणा लपविण्यासाठी फालतू पसारा वाढवतात की काय? हे प्रश्न सोडवून पाहू.

या संदर्भात, एका मुलाखतीत तेंडुलकरांनी स्वतःच जे उत्तर देऊन ठेवले आहे, त्याचा आधार प्रथम घ्यावासा वाटतो. ते उत्तर असे– "एकांकिकेचा घाट अत्यंत बांधीव असतो, त्यात इकडे तिकडे पसरायला वावच नसतो. नाटकामध्ये विषय तपशिलाने येऊ शकतो, जो आशय व्यक्त करायचा त्याचे तपशील नाटकांत देता येतात. कुणी असं म्हणेल की, तुम्हांला एकांकिकेचा विषय सुचला आणि तुम्ही त्याचं नाटक केलं. पण असं होऊ शकत नाही. एखादा विषय त्याचा घाट घेऊनच येत असतो–एकांकिकेचा किंवा नाटकाचा. एखादं नाटक हे काही प्रेक्षकांना कमी बांधेसूद तर काहींना अधिक बांधेसूद वाटतं. त्या नाटकाचा काही तपशील काहींना गैरवाजवी वाटतो तर काहींना अतिशय महत्त्वाचा वाटतो."[१५] याच मुलाखतीत पुढे नाटक व पटकथा या माध्यमांबद्दलही तेंडुलकर बोललेले आहेत. त्यावरून भिन्न अभिव्यक्तिमाध्यमांबद्दल, त्यांच्या व आपल्या आवाक्याबद्दल ते जागरूक आहेत, हे लक्षात येते. आणि म्हणूनच, नाटक व एकांकिका यांच्याबद्दल त्यांनी केलेली विधाने आधार म्हणून महत्त्वाची मानता येतात.

तेंडुलकरांनी सांगितल्याप्रमाणे त्यांचे प्रत्येक नाटक विषयानुरूप घाट घेऊनच आलेले आहे– 'कावळ्यांची शाळा', 'सरी ग सरी', – काहीसा अघळपघळ. 'चिमणीचं घर....', 'घरटे अमुचे...' – आटोपशीर, थोडा सैलसर. 'माणूस नावाचे बेट', 'अशी पाखरे....', 'शांतता....' – हलकाफुलका वाटणारा, पण कारुण्यमय असणारा. 'सखाराम...', 'घाशीराम....' – तुटकतुटक वाटणारा, पण अटकर असणारा. 'श्रीमंत', 'मधल्या भिंती', 'गिधाडे', 'मित्राची गोष्ट', 'कन्यादान' – – मनावर कमालीचा ताण आणणारा. 'मी जिंकलो...', 'एक हट्टी मुलगी', 'पाहिजे जातीचे' यांत काही भाग ढिसाळ आहे असे कदाचित म्हणता येईल. 'दंबद्वीप....', 'भाऊ मुरारराव', 'भल्याकाका', 'बेबी', 'कमला' यांच्या बाबतीत मात्र तसे म्हणता येणार नाही–कारण सारे ठाकठीक आहे. तेव्हा असे खचित म्हणता येईल की, तेंडुलकरांची बहुतेक सर्व नाटके अनुरूप असाच घाट घेऊन अवतरलेली आहेत.

आणखी फोड करून मांडणी करावयाची झाली तर ती पुढीलप्रमाणे करता येणे शक्य आहे– तेंडुलकरांच्या काही महत्त्वाच्या नाटकांचा जीव एकदम लहान वाटला (उदा. 'माणूस....', 'अशी पाखरे....', 'भाऊ मुरारराव', 'बेबी') तरी तो एकांकिकांतून सामावला जाईल असे वाटत नाही, किंबहुना घुसमटेल असे वाटते. 'श्रीमंत', 'मधल्या भिंती', 'शांतता....', 'गिधाडे', 'सखाराम....', 'कन्यादान' इत्यादी नाटकांतील अटीतटीचे सामने, सारे ताण–तणाव एकांकिकेच्या मर्यादेत कसे मावू शकतील? कसेबसे कोंबतादेखील येणार नाहीत– कोंबता कोंबताच कोंडमारा होऊन ते खलास होतील! तेंडुलकरांनी तसे होऊ दिलेले नाही. मुद्दा हा की, त्यांचा अनुभव मुळात तोकडा असतो व नाटकात तो ते कसा तरी बसवतात असे सामान्यतः म्हणता यावयाचे नाही.

तेंडुलकरांच्या नाटकांतील नाट्याचे स्वरूप लक्षात घेता, ते आपल्या नाटकाची लय बहुधा संथ, विलंबित का ठेवतात असा प्रश्न पडत नाही. आणि ती लय लक्षात घेता, आपल्या नाट्यानुभवाचा (नसलेला, तरी कधीकधी भासणारा) तोकडेपणा लपवण्यासाठी तेंडुलकर तपशिलाचा निरर्थक, अप्रेस्तुत पसारा मांडत आहेत असे तर मुळीच वाटत नाही. एखाद्या नाटकातील

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

एखाददुसऱ्या घटकाबद्दल किंवा फार तर एखाद्या संपूर्ण नाटकाबद्दल असे वाटले तर ती व्यक्तिसापेक्ष बाब म्हणून बाजूला सारता येईल. परंतु सरसकट सर्वच नाटकांबद्दल कोणाला असे वाटत असेल तर त्याची दखल गंभीरपणे घेणेच क्रमप्राप्त ठरेल. वासडीकरांच्या विधानांचा परामर्श घेतला तो याच भूमिकेतून.

आतापर्यंत, तेंडुलकरांच्या वेगवेगळ्या मर्यादांची साधक-बाधक चर्चा करून झाली. ही चर्चा करीत असतानाच, काही मर्यादा ओलांडण्याचा प्रयत्न तेंडुलकरांनी कसा केलेला आहे, तेही दाखवून दिले. येथे आपोआपच विकासाचा प्रश्न उद्भवतो. तीस वर्षे तेंडुलकरांचे नाट्यलेखन चालू आहे. या कालावधीत त्यांच्या लेखनात काही लक्षणीय असे बदल होत आले आहेत काय, हे आता पाहिले पाहिजे. तेंडुलकरांच्या लेखनात परिवर्तन कसकसे झाले– जीवनदर्शनाच्या बाबतीत, नाट्य-दर्शनाच्या बाबतीत, रचना-तंत्राच्या बाबतीत (हा प्रश्न प्रस्तुत पुस्तकात, ते तंत्रदृष्टीने लिहिलेले नसल्यामुळे, दुय्यमच ठरेल) – क्रमाक्रमाने पाहत जाऊ.

या दृष्टीने, प्रा. गो. म. कुलकर्णी[२६] व प्रा. सुधीर रसाळ[२७] यांनी जे विवेचन केले आहे, त्यात चांगलाच मार्मिकपणा आहे. पण त्याहीपेक्षा काही वेगळे विवेचन करता येईल. तेंडुलकरांच्या नाट्यलेखनाच्या तीस-एकतीस वर्षांच्या कालखंडाचे दोन तुकडे सरळ-सरळ पडतात – एक 'शांतता...' पूर्व व दुसरा 'शांतता...' उत्तर, म्हणजे १९५५-५६ ते ६७-६८ एक व १९६८ ते ८५ दुसरा. एवढे दोनच विभाग अभ्यासदृष्ट्या सोईचे व पुरेसे आहेत. पहिल्या दहाबारा वर्षांतील नाट्यलेखन व नंतरच्या सोळा-सतरा वर्षांतील नाट्यलेखन यांत तेंडुलकरांचा कल, भर कसा बदलला हे आता पाहावयाचे.

पहिल्यांदा तेंडुलकर मध्यमवर्गाच्या घरकुलात रमलेले होते, तेव्हाही त्यांची नजर त्यापलीकडे, खोलवर, कोठेतरी भिरभिरत होतीच; पण पुढे ते उघड-उघड त्या घरकुलाच्या बाहेर पडूनच नवे क्षितिज न्याहाळू लागले – उच्च स्तरावरील जीवनदर्शनावर संतुष्ट न होता निम्न स्तरावरील जीवनदर्शन घडवण्यासाठी त्यांनी धिटाईने पाऊल टाकले. साध्या-भोळ्या दिसणाऱ्या, पण बिलंदरही असू/होऊ शकणाऱ्या समाजघटकांतील फेरफटक्याप्रमाणेच, मुत्सद्दी, पाताळयंत्री, कावेबाज, संभावित, अशा VIP, पण शेवटी आतून लहान, हलक्या मंडळीतूनही तेंडुलकरांनी संचार सुरू केला. तथापि त्यांचे लक्ष जास्त खिळून राहिले ते विचित्र व उग्र मानवी वर्तनावर, लैंगिक व हिंसक आचारांवर, बाहेरून मानवी वर्तन पाहूनच ते थांबले नाहीत, तर त्यांनी मानवी मनोव्यापारांतही आतून डोकावून बघितले. अर्थात मानसशास्त्रज्ञाच्या शास्त्रीय पद्धतीने नव्हे, तर नाटककाराच्या कलात्मक दृष्टीने. तर असे हे तेंडुलकरांनी न्याहाळलेले नवे क्षितिज.

अलीकडे तेंडुलकरांच्या लेखनातून हलक्या-फुलक्या नाट्याचे प्रमाण किंवा गंभीर नाट्य गमतीदार पद्धतीने मांडण्याच्या प्रवृत्तीचे प्रमाण कमी झालेले दिसते, नाट्य रोखठोक रीतीने पेश करण्याची प्रवृत्ती वाढलेली दिसून येते. गांभीर्य वाढते असले तरी तत्त्वप्रचुर सुभाषितांच्या (भस्मांच्या पट्टयांसारख्या) पट्टयांच्या साहाय्याने ते वाढवण्याचा आटापिटा मात्र मुळीच दिसून येत नाही. कारण मुळातील गांभीर्य-अस्तित्ववेदनेच्या वेधातून आलेले-हेच मुळी अस्सल आहे. अस्तित्ववादाकडे तेंडुलकरांचा रोख असला व अनुषंगाने व्यस्ततेचे (ॲब्सर्डिटीचे) दर्शन त्यांनी घडवलेले असले तरी पूर्ण व्यस्त नाट्यापर्यंत ते पोचलेले नाहीत. आणि अजून तरी तशी त्यांची आकांक्षाही दिसत नाही. (आधारासाठी यापुढील दुसरा परिच्छेद पाहावा.)

'शांतता...' पासून सुखात्म अनुभव किंवा शोकात्म अनुभव यापेक्षा मिश्र नाट्यानुभवात, विशुद्ध नाट्यानुभवात तेंडुलकरांना अधिकाधिक स्वारस्य वाटू लागलेले दिसते. विशिष्ट, बंदिस्त नाट्यबंधात अडकून पडण्याऐवजी अपरिचित, मुक्त अशा नाट्यबंधाचे आकर्षण तेंडुलकरांना जास्त जास्त वाटू लागलेले दिसते. 'पाहिजे जातीचे', 'मित्राची गोष्ट'मध्ये तर, कथन



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व प्रक्षेपण (नॅरेशन व प्रोजेक्शन) असा कथनात्मक नाट्यबंध त्यांनी वापरलेला आहे. नाटकाच्या दृश्य अंगावरील तेंडुलकरांचे प्रेमही अलीकडे बरेच वाढू लागलेले दिसते. उदाहरणार्थ 'घरटे अमुचे....' मधील चित्रपट-सदृश प्रसंगसंयोजन, 'भाऊ मुरारराव' -मधील 'दूरदर्शन' (टेलिव्हिजन) चे उपयोजन....तेंडुलकरांच्या नाट्यलेखनात दिसून येणाऱ्या ठळक, महत्त्वाच्या बदलांच्या या काही नोंदी, बारीकसारीक बदलांची ही जंत्री नव्हे.

तेंडुलकरांच्या नाट्यलेखनात लक्षणीय परिवर्तन कोणते झाले-प्रामुख्याने जीवनदर्शन व नाट्यदर्शन या दोन बाबतींत - ते बारकाईने, पण सूत्ररूपाने दाखवून दिले. याला पूरणिका म्हणून तेंडुलकरांच्या मुलाखतीतील दोन अवतरणे उद्धृत करावीशी वाटतात. – (१) "हिंसाचाराचा विषय पुनः पुन्हा हाताळायला सुरुवात केल्याबरोबर माझे लेखन बदलून गेले..... 'गिधाडे' हा माझ्या दृष्टीने एक प्रचंड धक्का होता. मी पूर्वीची चौकट मोडून बाहेर पडलो."[२८] (२) आपल्याकडे अजून निखळ वास्तववाद (वेगळ्या शब्दांत 'नवनाट्य') देखील रुळलेला नाही, 'न-नाट्य' हे तर फार पुढले आहे.... जीवन मला सुंदर भासते. असला माणूस न-नाट्यवादी कसा होणार?"[२९]

येथे एक कल्पना मनात येते. 'गिधाडे'ने आपल्याला धक्का दिला, आपण पूर्वीच्या चौकटीतून बाहेर पडलो, असे तेंडुलकर म्हणतात आणि 'गिधाडे' जवळ-जवळ दहा वर्षे (१९६१-७१) धूळ खात पडले होते, असेही तेच (नाटकाच्या प्रास्ताविकात) सांगतात. मनात येते की, यदाकदाचित 'गिधाडे' १९६१ मध्येच रंगभूमीवर अवतरले असते तर तेंडुलकर चौकटीबाहेर आधीच आले असते की काय? आणि आले असते तर पुढे त्यांच्या लेखनातील बदलांनी आणखी कोणता पल्ला गाठला असता? पण अशी कल्पना करण्यात काहीच अर्थ नाही. प्रत्यक्षात जे घडले त्याचा आढावा घेणे हेच केव्हाही श्रेयस्कर आणि आतापर्यंत तसाच आढावा घेऊन, तेंडुलकर आज कोणत्या टप्प्यावर येऊन उभे आहेत, याचे दर्शन घडविले आहे. या टप्प्यावर, प्रा. रसाळ म्हणतात तसे, तेंडुलकर आधुनिक जीवनातील आंतरविरोधाचा जास्तीत जास्त वेध घेण्याची धडपड करताना दिसतात.

येथे, तेंडुलकरांचे-त्यांच्या नाट्यशक्तीचे-यथातथ्य दर्शन घडावे यासाठी, त्यांची खानोलकरांशी तुलना केली तर ती उपयुक्त ठरेल. अशी तुलना केली तर असे वाटू लागते की, जीवनवेध घेण्याची प्रवृत्ती व नाट्यनिर्मितीची प्रवृत्ती दोघांतही समान असली तरी खानोलकर जी भरारी घेतात ती भरारी तेंडुलकर घेऊ शकत नाहीत की काय! पण थोडा खोल, सूक्ष्म विचार केला तर असे ध्यानात येते की, फरक वेधशक्तीच्या क्षमतेत नसून कल्पनाशक्तीच्या क्षमतेत आहे. पुढील उदाहरणे या दृष्टीने पाहावीत-

तेंडुलकर - "व्हायचं ते तरीसुद्धा होणार! ते आता टळणार नाही..." (मधल्या भिंती)

खानोलकर - "ते घडायचं असतं. आणि जे घडायचं असतं त्याचं समर्थन अथवा विच्छेद करणारे आम्ही कोण? कार्यकारण ...ही सगळी तर्कशास्त्राची तर्कटं आहेत. आमच्या गवताच्या घरट्याची ही तर्कटं काळाच्या गतीवर टिकणार नाहीत." (कालाय तस्मै नमः)

तेंडुलकर - "हे विसाव्या शतकातील सुसंस्कृत माणसांचे अवशेष. पहा कसे एकेकाचे चेहरे रानटी दिसत आहेत ते." (शांतता! कोर्ट चालू आहे.)

खानोलकर - "कसला पाशवी आनंद! कशासाठी? गंगाधर, अवघी मानवता कानाच्या पडद्यावर किंकाळ्या मारतेय ...ख्रिस्ताच्या अंगावरचा खिळान्‌खिळा कोंभासारखा तरारून आलाय बघ. प्रत्येक कोंभ लव-लवतोय." (अवध्य)

तेंडुलकर - "पापपुण्याच्या गोष्टी आहेत इतरांसाठी, ज्यांच्यावर हा शाप पडलाय त्यांना फक्त हा शाप...." (गिधाडे)

खानोलकर - "पाप म्हणजे नक्की काय? पाण्यातला चिखल हा काय पापवत ठरेल? त्या

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चिखलाचा तळ पाण्याला नसेल तर पाणी या जगात ठरेल का? ....” (कालाय तस्मै नमः)

जीवनातील अटळपणा, अमानुषता, पाप-पुण्य-मूल्य यांच्याविषयीच्या, तेंडुलकर व खानोलकर यांच्या नाटकांतील अवतरणांच्या जोड्या वर दिल्या आहेत. त्यांची सूक्ष्म पाहणी केली तर असे ध्यानात येते की, तेंडुलकर सरलोक्तीचा आश्रय करतात, तर खानोलकर वक्रोक्तीचा. तेंडुलकर प्रतिमाविरहित वाक्यरचना करतात, तर खानोलकर प्रतिमासहित. आणखी असेही ध्यानात येते की, तेंडुलकरांना फुलोरा प्रिय नाही-ते एक-दोन वाक्ये लिहून पुढे जातात. उलट खानोलकरांना फुलोरा प्रिय आहे-ते मूळ वाक्याभोवती आणखी प्रतिमात्मक वाक्यांची गुंफण करतात. तेंडुलकर गद्याच्या रोकड्या शक्तीने वाक्य भारतात, तर खानोलकर काव्याच्या व्यंजनाशक्तीचा वाक्यातून संचार करवितात. परिणामी तेंडुलकरांचे वाक्य एका ठिकाणी रुतून बसते, खानोलकरांचे दूरवर पसरत जाते. याचा अर्थ असा की, साधारणपणे एकच आशय दोघांना व्यक्त करावयाचा असला तरी दोघांच्या अभिव्यक्तीत फरक पडतो. तेंडुलकर घोडदौडीप्रमाणे जमिनीवरून मार्गक्रमण करीत जातात, तर खानोलकर गरुडभरारीप्रमाणे उंचावरून भरारी घेत जातात. हा फरक पडण्याचे एक कारण, तेंडुलकरी शैलीला कल्पनेचे पंख लाभलेले नाहीत, उलट खानोलकरी शैलीला ते लाभलेले आहेत. (तेंडुलकरांनी हेतुतः, आपण होऊन, ते पंख छाटून टाकलेले आहेत की काय! कारण, त्यांच्या ललित लेखांतून त्यांची विलसिते दिसतात; पण नाटकांतून ती पाहावयास मिळत नाहीत!) तेव्हा खानोलकरांच्या मानाने तेंडुलकरांचे वाङ्मयीन उड्डाण कल्पनाविलसितांच्या अभावी कमी विलोभनीय वाटले तरी त्यांची झेपशक्ती मूलतः कमजोर नाही आणि तेंडुलकरांचे उड्डाण कमी विलोभनीय वाटले तरी ते कमी प्रभावीही ठरते असेही नव्हे.

इतका विचार झाल्यावर, इतकी साधकबाधक चर्चा केल्यानंतर, आता काही निष्कर्ष काढता येतील ते असे-

(१) तेंडुलकरांच्या नाटकांचे वळण इब्सेनच्या वळणासारखे असले तरी त्यांच्यावर ‘इब्सेनवादा’चा शिक्का मारलाच पाहिजे असे नाही.

(२) मध्यमवर्गाची मर्यादा तेंडुलकरांना पडली आहे, असे प्रथमदर्शनी वाटले, तरी दोन प्रकारांनी ती त्यांनी ओलांडली आहे-ती मर्यादाच मोडून व तिच्यात राहून देखील, व्यापक जीवनदर्शन घडवून-असे सूक्ष्म चिकित्सेअंती लक्षात येते.

(३) एकांकिकांतूनच तेंडुलकरांचे खरे सामर्थ्य दिसते, हे म्हणणे त्यांच्या नाटकांवर अन्याय करणारे आहे.

(४) तेंडुलकरांची वेधशक्ती नव्या जाणिवांचा वेध घेताना विचित्र रूप धारण करीत असली तरी ती बोथट होते असे सरसकट म्हणता येणार नाही.

(५) तसेच तेंडुलकरांनी अखेरची मर्यादा गाठलेली आहे, असे जरी म्हणता आले नाही, तरी लगेच त्यांची खरी शक्ती अजून अवतरायचीच आहे, असे म्हणणेही जरा जास्तच होईल.

तेंडुलकरांच्या नाटकांचा क्रमशः परामर्श मागील विभागात घेतला आणि त्या बैठकीवर, पार्श्वभूमीवर त्यांचा साकल्याने विचार या विभागात केला. विचारान्ती नोंदवावेसे वाटले ते हे निष्कर्ष.



संदर्भटीपा


१. गो. म. कुलकर्णी, ‘नाटककार विजय तेंडुलकर : एक जिंकणे-हरणे’, सत्यकथा, मुंबई, डिसेंबर १९७१, पृ. ४९.

२. गो. म. कुलकर्णी, साद-पडसाद, मुंबई, १९७५, पृ. १७७.

३. जॉफ्रे ब्रेरटन, प्रिन्सिपल्स ऑफ ट्रॅजेडी, लंडन, १९६८, पृ. २०.

४. तत्रैव, पृ.२७९.

५. गो. म. कुलकर्णी, उनि, क्र. ३१, पृ. ३९.










राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

६. प्र. श्री. नेरूरकर, 'सखाराम आहे तरी कोण?', साधना, पुणे २७।५।१९७२, पृ. १८.
द. भि. कुलकर्णी, 'तेंडुलकरांची तीन नाटके', समाज प्रबोधन पत्रिका, पुणे, नोव्हेंबर–डिसेंबर १९७२, पृ. ३५.
७. द. ता. भोसले, 'गिधाडे आणि सखाराम बाइंडर - काही विचार', नवभारत, वाई, जानेवारी १९७३, पृ. ९३.
सुधीर रसाळ, 'नाटककार तेंडुलकर आणि सखाराम बाइंडर', प्रतिष्ठान, औरंगाबाद, जून–जुलै १९७२, पृ. ८.
धों. वि. देशपांडे, 'मला दिसलेले सखाराम बाइंडर', सत्यकथा, मुंबई, जुलै १९७२, पृ.६१, ६८.
म. वा. धोंड, सखाराम बाइंडर, समाज प्रबोधन पत्रिका, पुणे, जानेवारी - फेब्रुवारी ९७४, पृ. ११.
८. माधव मनोहर,'मराठी नाटक थिटे का?', नाटक, मुंबई, एप्रिल १९६०, पृ. १५.
९. गो. म. कुलकर्णी, उनि, क्र. ३१, पृ. ३८.
१०. विजय तेंडुलकर, मुलाखत, विश्वनाथ मोरे, मराठा, मुंबई, २३।३।६९, पृ. ६.
११. जी. बी. शॉ, 'दी क्विंटेसेन्स ऑफ इब्सेनिझम', हेन्रिक इब्सेन, इंग्लंड, १९७०, पृ. १२९.
१२. श्री. ना. बनहट्टी, मराठी नाट्यकला आणि नाट्यवाङ्मय, पुणे, १९५९ पृ. १८६–१८९.
१३. जी. विल्सन नाइट, इब्सेन, लंडन, १९६६, पृ. ४७.
१४. गो. म. कुलकर्णी, उनि, क्र. ३१, पृ. ४५.
१५. धों. वि. देशपांडे, 'नाट्यसाहित्यसंमेलनात सखाराम बाइंडर', निवेदक–शशिकांत नारवेकर, गोमंतक, पणजी, ७।५।१९७२, पृ. ६, यावरून उद्धृत.
१६. अरुण साधू, 'जबरदस्त लक्ष्मी व अखेरीस कोसळलेला सखाराम', माणूस, पुणे, १३।५।१९७२, पृ. १०.
१७. अनिल अवचट, 'सखाराम तू कोण आहेस?', साधना, पुणे, १३।५।१९७२, पृ. ११–१२.
१८. दि. के. बेडेकर, अस्तित्ववादाची ओळख, पुणे, १९७२, पृ. २१, २५ व २६.
१९. विश्वास पाटील, 'अस्तित्ववाद', नवी क्षितिजे, मुंबई, जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९७३, पृ. ४०५–०६, ४१२–१३.
१९अ. तत्रैव, ऑक्टो. नोव्हें. डिसेंबर १९७१, पृ. ६५२, ६३४–३५.
१९आ. तत्रैव, जुलै–ऑगस्ट–सप्टेंबर १९७१, पृ. ४९९, ५०२–५०३, ५०४.
१९इ. तत्रैव, जाने.–फेब्रु.–मार्च १९७०, पृ. १११, ११५–१६.
१९उ. तत्रैव, जाने. – फेब्रु. — मार्च १९७२, पृ. ७६. ऑक्टो. - नोव्हें. - डिसें. - १९७१, पृ. ६३२. जाने.–फेब्रु.–मार्च १९७२, पृ. ११६.
२०. रा. शं. वाळिंबे, 'एग्झिस्टेंन्शिॲलिझम', साहित्यातील संप्रदाय, पुणे, १९७४, पृ. ४२४, ४२९.
२१. गो. म. कुलकर्णी, उनि, क्र. ३१, पृ. ४४, ४५.
२२. तत्रैव, पृ. ५२.
२३. दीनानाथ लाटे, 'गृहस्थ ते गिधाडे', नाट्यभूमी, मुंबई, ऑगस्ट १९७०, पृ. ९.
२४. लता वासडीकर, 'तेंडुलकरांच्या एकांकिका,' प्रतिष्ठान, औरंगाबाद, जुलै–ऑगस्ट १९६५, पृ. २०.
२५. विजय तेंडुलकर, मुलाखत, ललित, पुणे, मे १९७६, पृ. १९.
२६. गो. म. कुलकर्णी. उनि, क्र. ३२, पृ. १५१.
२७. सुधीर रसाळ, उनि, क्र. ३७, पृ. ६–९.
२८. विजय तेंडुलकर, मुलाखत, संदीप पेंडसे, फल्क्रम, मुंबई, नोव्हेंबर–डिसेंबर १९७५, पृ. २४.
२९. विजय तेंडुलकर, मुलाखत, 'जिज्ञासू', मनोहर, दिवाळी १९६३, पृ. १०१ व १०३.









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# महाभारत संहितेवरचे संशोधन

विश्वनाथ खैरे

नवभारत फेब्रुवारी २००८ अंकात पृ. ३१-३५ वर "श्रीकृष्णाने वसुदेवास सांगितलेला भारतीय युद्धाचा वृत्तांत" हा डॉ. मेहेंदळे यांचा लेख आला आहे. (यापुढे लेख असा निर्देश). "कृष्ण हा युद्ध प्रत्यक्ष पाहणारा, तेव्हा त्याच्याकडून युद्धाची खरीखुरी माहिती" वसुदेवाला मिळाली ती म्हणजे महाभारत १४.५९ अध्यायात थोडक्यात आलेला तो वृत्तांत. संजयदेखील युद्धाचा 'प्रत्यक्षदर्शी', त्याने धृतराष्ट्राजवळ केलेले वर्णन महाभारतात इतरत्र आले आहे. कृष्णाचा वृत्तांत आणि संजयाची वर्णने यांच्या तपशिलांची तुलना करून लेखात त्यांच्यातले फरक कृष्णाच्या वृत्तांताची अविश्वासार्हता, संजयवर्णनाशी सुसंगतीचा अभाव, (३१-१,२) पांडवांच्या बाजूने पक्षपात (३२-१) सत्यापलाप (३२-२) अतिशयोक्ती (३३-१) अंतर्विसंगती (३३-१) सत्याला सोडून निवेदन (३३-२) न झालेल्या श्राद्धाचा उल्लेख (३३-२) आधीच्या हकीकतीची दुरुस्ती (३४-१) त्यातले तथ्य (३४-२) अवास्तव नसणे (३५-१) विसंगती नसणे (३५-१) संजयवर्णनातली अतिशयोक्ती (३५-१) ढोबळ मेळजोळ (३५-२) अशी अवेक्षणे मांडली आहेत. त्यासाठी लेखात अनेक तपशिलांची चर्चा आली आहे. महाभारताच्या चिकित्सक प्रतीतले संदर्भ भरपूर दिलेले आहेत.

## १. संहितेच्या शब्दाचे प्रामाण्य

कृष्ण आणि संजय यांनी सांगितलेल्या वृत्तांतांची तुलना म्हणजे संहितेत कवींनी त्यांच्या तोंडी जे शब्द घातलेले असतील त्यांच्या आशयाची तुलना. तो आशय इतिहासाच्या, पुराणकथेच्या का कल्पितकथेच्या स्वरूपाचा आहे याचा निश्चय लेखात केलेला नाही. "कृष्ण हा युद्ध प्रत्यक्ष पाहणारा" आणि "कृष्णासारखाच संजय देखील युद्धाचा 'प्रत्यक्षदर्शी'" असे लेखात म्हटले असल्यामुळे त्यांचे वृत्तांत 'चक्षुर्वै सत्यं' स्वरूपाचे आहेत असे मानले असल्याचे दिसते. पण त्या मान्यतेलाही पुढच्याच वाक्यात मानवी पातळीवरच्या विचाराने छेद दिला आहे; " संजय आणि कृष्ण दोघेही रणांगणावर प्रत्यक्ष हजर असले तरी रणभूमीवर सर्वत्र चाललेले युद्ध त्यांनी पाहिले असणे शक्य नाही. काही युद्ध त्यांनी प्रत्यक्ष पाहिलेले असणार, काही माहिती ऐकीव असणार. त्यामुळे त्यांच्या वर्णनात तपशिलाच्या बाबतीत थोडा फरक आढळला तर तो समजण्यासारखा आहे." संहिता प्रमाण मानायची असेल तर हा छेद मान्य करता येणार नाही. संहितेत संजयबद्दल व्यासांच्या मुखी असे शब्द घातले आहेत की, "सबंध संग्रामात याला न दिसणारे असे काही होणार नाही. उघड किंवा गुप्त, दिवसा किंवा रात्री होणारे युद्ध, मनात चिंतिलेलेसुद्धा सारे त्याला समजेल." (एतस्य सर्वसंग्रामे न परोक्षं भविष्यति।६.२.९। प्रकाशं वा रहस्यं वा रात्रौ वा यदि वा दिवा। मनसा चिन्तितमपि सर्वं वेत्स्यति संजयः। ६.२.११). आणखी पुढे जाऊन असे म्हणता येईल की, संहितेतल्या शब्दांनुसार संजय आणि कृष्ण यांना प्रत्यक्षदर्शी म्हणायचे असेल तर त्याच संहितेनुसार खुद्द व्यास हे तर त्रिकालदर्शी असल्यामुळे अवघ्या संहितेतले सर्वच तपशील 'यथातथ्य' असल्याचे मान्य करावे लागेल (भविष्यति रणे घोरे भरतानां पितामहः। प्रत्यक्षदर्शी भगवान् भूतभव्यभविष्यवित्।६.२.२) डॉ. मेहेंदळे यांच्या 'प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती' या ग्रंथात द्रौपदी वस्त्रहरण कथेविषयी म्हटले आहे; "कथानकातील पात्रांची जुळणी करून कोणावर काय कामगिरी सोपवयाची हे ठरवायला महाभारतकार एखादे नाटक लिहायला बसले नव्हते. घडलेल्या एका






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हकीकतीचे ते यथाभूत वर्णन करीत होते (११९)". यावरून ते महाभारताला इतिहासग्रंथ मानीत असावेत असे वाटते. त्यानुसार ते महाभारत महाकाव्याच्या संहितेतले पात्रांच्या उद्गारांचे आशय वाच्यार्थावरून ठरवून त्यांच्या परस्परांतल्या सुसंगती पारखीत आहेत. या पारखण्याच्या संशोधनमूल्याची चिकित्सा केली पाहिजे.

## २. उद्धृत संदर्भांची तपासणी

यासाठी प्रथम लेखात दिलेल्या संदर्भांची तपासणी केली पाहिजे. चिकित्सित आवृत्तीच्या पर्व-अध्याय-श्लोकांचे अंक लेखात सर्व ठिकाणी उद्धृत केले आहेत. थोड्याच ठिकाणी संहितेतले शब्द, चरण किंवा श्लोक उतरून दिले आहेत. पर्वे ६ ते ११, १४; अध्याय ५९, ६४, १६५ हे आकडे पाहिले की, मुळातला संदर्भ देण्यामागे ग्रंथाचे किती आलोडन झाले आहे याच्या कल्पनेने वाचक लेखात दिलेला त्यांचा आशय मान्यच करतो. आणि ते तपासायचे म्हटले तर केवढा खटाटोप करावा लागेल या विचाराने त्या भानगडीत पडत नाही. मात्र संहितेवरून ते तपासून पाहिले तर लेखात आधारासाठी घेतलेल्या संदर्भांतले कच्चे दुवे ध्यानी येतात.

कौरवांच्या सेनापतींबद्दल 'संजयाची माहिती' म्हणून लेखात म्हटले आहे : "अठरा दिवसांच्या युद्धात अनुक्रमे भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य आणि अखेर अश्वत्थामा (९.६४.३६-४०) असे कौरवांचे पाच सेनापती झाले." यातला ९.६४.३६-४० हा संदर्भ मुळात केवळ अश्वत्थाम्याच्या अभिषेकाचा आहे, पाची सेनापती या क्रमाने झाले अशा स्वरूपाचा नाही. बाकीच्या चार सेनापतींची नावे आधीच्या अनेक पर्वांवरून दिली आहेत.

"पांडवांचा पहिला सेनापती धृष्टद्युम्न अखेरपर्यंत चालू राहिला" या विधानाला आधार तळटीपेत दिला आहे की .. "दुर्योधन शिबिरात मारला गेलेल्या धृष्टद्युम्नाचा उल्लेख 'क्षुद्र सेनापती' असा करतो (१०.९.५४)." 'स चेत् सेनापतिः क्षुद्रो हतः सार्धं शिखण्डिना। तेन मन्ये मघवता सममात्मानमद्य वै।' या त्या श्लोकात कवीने दुर्योधनाच्या स्वभावाला व्यक्तरूप दिले आहे. परपक्षाच्या महावीरालासुद्धा क्षुद्र म्हटल्याची उदाहरणे संहितेत अनेक आहेत. मुख्य म्हणजे सेनापतिः या शब्दाने धृष्टद्युम्नाचे 'अखेरपर्यंतचे' सेनापतित्व सिद्ध होत नाही. जसे, याच अध्यायातल्या पहिल्याच श्लोकात "अकरा चमूंचा धनी दुर्योधन मारला जाऊन पडला आहे, (एकादशचमूभर्ता शेते दुर्योधनो हतः। १०.९.१।)" असे म्हटले आहे तरी, हत झाला त्यावेळी दुर्योधनाकडे अकरा चमू नव्हत्या हे उघड आहे. पांडवांचा पहिला सेनापती धृष्टद्युम्नच होता का याबद्दलही गीतारंभीच्या 'संजय उवाच'वरूनच शंका काढता येईल : अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम्। पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम्। या श्लोकातला भीष्म जर कौरवांचा सेनापती होता तर पांडवांचा पहिला सेनापती भीम होता असेच म्हणावे लागेल.

## ३. पांडवांचे सेनापती

"कृष्णाने वसुदेवाला दिलेल्या माहितीप्रमाणे पांडवांचेही याच क्रमाने शिखण्डी, धृष्टद्युम्न, अर्जुन आणि युधिष्ठिर असे चार सेनापती झाले. (१४.५९.९,१५,२०,२३) म्हणजे धृष्टद्युम्नाकडे पांडवांचे सेनापतिपद पाचच दिवस राहिले" हे सांगून "कृष्णाची ही माहिती विश्वासार्ह वाटत नाही" अशी लेखात टिप्पणी केली आहे.

येथे दिलेल्या मूळ संदर्भांमध्येही पांडवांच्या चार 'सेनापतीं'ची नावे क्रमाने दिली आहेत असे नाही. १४.५९.३,४ मध्ये वसुदेव म्हणतो, "भीष्म, कर्ण, कृप, द्रोण, शल्य इत्यादींशी थोर पांडवांचे तसेच इतर अस्त्रपटु क्षत्रियांचे अनुत्तम युद्ध कसे झाले (सांग)." उत्तरात कृष्ण सांगतो, "सगळे सांगायला शेकडो वर्षेही पुरणार नाहीत. प्राधान्याने पृथ्वीपतींच्या कर्तुती सांगतो" (१४.५९.७). मग भीष्मकर्णादी सेनापतींना कोणी कोणी मारले याचा तपशील कृष्ण देतो. "धीमान् अर्जुनाने



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रक्षिलेला शिखण्डी पांडवांच्या सप्तचमूंचा नेता झाला. त्याने भीष्माला मारले. भीमाने रक्षिलेला धृष्टद्युम्नही तसाच. त्याने द्रोण मारला. पांडवांच्या तीन चमू अर्जुनाच्या हुकमतीत असताना त्याच्याशी सामना झालेला कर्ण मरण पावला. राहिलेल्या एका अक्षौहिणीने युधिष्ठिराभोवती कडे केले. त्याने शल्याचा वध केला. (१४.५९,९,१५,२०,२३)." यावरून हे लक्षात येईल की, वसुदेवाच्या प्रश्नाला धरून, पांडवांच्या कोणत्या वीरांनी भीष्मादी कौरवसेनापतींना मारले त्यांची नावे कृष्णाने सांगितली, पांडवांच्या सेनापतींची यादी दिली नाही. त्यामुळे "कृष्णाची ही माहिती विश्वासार्ह वाटत नाही" ही लेखातली टिप्पणी योग्य नाही.

"त्याची माहिती खरी मानायची तर पांडवांनी जणू कौरवांच्या प्रत्येक सेनापतीचा मृत्यू कोणाच्या हातून होणार हे आधीच ओळखून त्याप्रमाणे आपले सेनापती बदलले." या टिप्पणीला फारसा अर्थ नाही. होऊन गेलेल्या घटनेतली नावे सांगितली त्यावरून असले अनुमान काढता येत नाही. (आणि लढाईतल्या डावपेचांच्या दृष्टीने पाहिले तर कोणत्या सेनापतीला कोण मारू शकेल हे ओळखणे प्रतिपक्षाला जरूरच आहे.)

'विश्वासार्ह, खरी' या विशेषणांवर खरा आक्षेप घेता येतो. संहितेत जे वर्णन आले त्याची विश्वासार्हता किंवा खरेपणा कशाच्या मापाने ठरवणार? महाभारताच्या संहितेतील वेगवेगळ्या पात्रांच्या मुखी वेगवेगळ्या कवींनी घातलेल्या शब्दरूपांच्या आशयावरून त्यांच्यातल्या फरकांची इतिहासाच्या नोंदींमधल्या फरकांसारखी चिकित्सा करता येणार नाही.

**४. द्रोणवधाची माहिती**

"खड्गाने द्रोणाचे शिर कापण्याचा प्रयत्न धृष्टद्युम्नाने आधीपण एकदा केला होता (७.१६४.१४५-१४९)" असे संजयाचे वर्णन म्हणून दिले आहे. त्या श्लोकांमध्ये धृष्टद्युम्नाला सापावर झडप घालणाऱ्या गरुडाची (वैनतेय इवोरगम् १४५) आणि हिरण्यकशिपूच्या वधावेळच्या विष्णूची (यथा रूपं परं विष्णोः हिरण्यकशिपोर्वधे १४६) उपमा दिली आहे. त्या दोन्ही प्रसंगांत 'शिरच्छेदाची' घटना नाही; पोटात चोच किंवा नख्या खुपसण्याची आहे. धृष्टद्युम्नाने खड्ग चालवण्याचे एकवीस प्रकार करून दाखवले. पण द्रोणाने त्याचे खड्ग आणि चर्म हजार बाणांनी नष्ट केले. द्रोणाने शस्त्रत्याग केला नव्हता; पण शिरच्छेदाचा हेतू साध्य होऊ दिला नव्हता असे काही संजयाच्या वर्णनात नाही.

द्रोणाने शस्त्र खाली ठेवले होते हे सांगण्यासाठी ७.१६५.३३–३५ हा संदर्भ दिला आहे. त्यात "मी शस्त्र टाकून देतो" असे शब्द द्रोणाच्या तोंडी घातले आहेत. पण "धृष्टद्युम्नाच्या तावडीत सापडलेल्या द्रोणाला पाहून (द्रोणं तथागतं दृष्ट्वा धृष्टद्युम्नवशं गतम् १६५.३७) प्राणिमात्रांनी हाहाकार केला. त्यानंतर योगाचाराने द्रोण आकाशाला गेला (योगमास्थाय.. दिवमाक्रमत् १६५.३९) आणि तो असा ब्रह्मलोकाला गेलेला, संजय कृष्ण इत्यादी फक्त पाच जणांनी पाहिला (१६५.४१) त्या गतप्राण देहाचे डोके उचलून धृष्टद्युम्नाने तलवारीने त्या मूक शरीरापासून शिर वेगळे केले (तस्य मूर्धानमालम्ब्य गतसत्त्वस्य देहिनः। किंचिदब्रुवतः कायाद् विचकर्तासिना शिरः १६५.४७)." असे असल्यामुळे "द्रोणवधाचे खरे कारण द्रोणाचा शस्त्रत्याग" असा संजयाच्या वर्णनाचा आशय निघू शकत नाही. तसेच, "धृष्टद्युम्नवशं गतः" असा प्रयोग दोन्ही वृत्तांतात आला असल्यामुळे त्याही बाबत कृष्णाच्या तोंडी घातलेल्या प्रयोगाला गैर लेखता येत नाही. एवंच, आधारासाठी दिलेल्या संदर्भावरून लेखातली भाष्ये करता येण्यासारखी नाहीत.

**५. कर्णवधाचे वर्णन**

"कर्णाच्या रथाचे चाक गर्तेत सापडले ती संधी साधून त्याला मार (७.१५५.२८) अशी सूचना कृष्णाने अर्जुनाला" दिली यावरून कर्णवध अर्जुनाला सोपा नव्हता आणि कर्णार्जुनाचे युद्ध 'दारुण' होते म्हटले; तरी,

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लढताना मेलेल्या कर्णाला अग्नीत पडणाऱ्या पतंगाची उपमा (१४.५९.२१) देऊन 'कृष्णाने कर्णाच्या पराक्रमाचे भलतेच अवमूल्यन केले आहे' असे लेखात म्हटले आहे.

दोन्ही संदर्भ आणि त्यांच्या आसपासचे वर्णन नीट वाचले तर त्यांच्यात काव्यगत सुसंगती असल्याचे दिसून येते आणि अवमूल्यनाचा आक्षेप दूर होतो. ७.१५५.२८ या संदर्भातला 'सापडले' हा भूतकाळी शब्द 'सापडेल' असा भविष्यकाळी पाहिजे. त्या अध्यायात घटोत्कचवधानंतर कृष्णाला झालेल्या हर्षाचे वर्णन आहे. इंद्राकडून शक्ती प्राप्त झालेला कर्ण देवादिकांनाही भारी होता, त्याची ती शक्ती घटोत्कचाच्या वधाला कामी आल्यामुळे अर्जुनाला भय उरले नाही म्हणून कृष्णाला आनंद झाला. तरीसुद्धा कर्ण हा पराक्रमी असल्यामुळे कृष्णाच्या तोंडी कवीने घातले की, "रथाचे चाक भुईत गाडले असताना, अतिजागरूक तू संकटात भूल पडलेल्या त्याला जाणीवपूर्वक मारशील हाच एक त्याच्या वधाचा उपाय असेल. (एको हि योगोऽस्य भवेद् वधाय छिद्रे ह्येनं स्वप्रमत्तः प्रमत्तम्। कृच्छ्रप्राप्तं रथचक्रे निमग्ने हन्याः पूर्वं त्वं तु संज्ञां विचार्य ७.१५५.२८)". मात्र याच्या आधीच्याच २७ व्या श्लोकात कृष्णाचेच बोल आहेत, "दिव्यास्त्रांचे जल धारण करणारा मेघच असा कर्ण पावसासारखा बरसणारा आहे. तो आज, इंद्राने दिलेली शक्ती (घटोत्कचावर) वेचल्यामुळे माणूस झाला आहे (दिव्यास्त्रजलदः कर्णः पर्जन्य इव वृष्टिमान्। सोऽद्य मानुषतां प्राप्तो विमुक्तः शक्रदत्तया। ७.१५५.२७)." मग अर्थातच दोघांच्या युद्धाच्या वेळी अर्जुन कर्णापेक्षा उजवा होता. म्हणून कृष्णाने वसुदेवासमोर, युद्धानंतर कित्येक दिवसांनी कर्णाचे अवमूल्यन केले असे काव्यवाचक म्हणूनही म्हणता येणार नाही.

"कर्णार्जुनाचे युद्ध एकतर्फी असते तर कृष्णाने त्याला 'दारुण' म्हणण्याचे कारण नव्हते" या शेऱ्याला "पञ्चत्वमगमत् सौतिः द्वितीयेऽहनि दारुणे १४.५९.२१" हा संदर्भ आधी उतरलेलाच आहे. शब्दशः अर्थ घेतला तर ('सूतपुत्र दारुण दुसऱ्या दिवशी पंचत्वाला गेला'), दारुण हे विशेषण युद्धापेक्षा दिवसाला लागू पडते आणि मरणाचा दिवस म्हणून ते योग्यच आहे. सारांश, या प्रतिपादनाचा उपयोग कर्णाचे श्रेष्ठत्व सिद्ध करण्याला होत नाही.

लेखात म्हटले तसे "साधेसुधे योद्धे" मोठ्या योद्ध्यांशी लढताना मरतात तेव्हाच अग्नि-पतंगाची उपमा येते – असे नाही. संजयवर्णनातही युधिष्ठिर स्वतःविषयी सांगतो, "भडकलेल्या आगीकडे पतंग झेपावत एकटाच मृत्यूकडे जातो तसा मी भीष्माकडे गेलो (यथा प्रज्वलितं वह्निं पतंगः समभिद्रवत्। एकतो मृत्युमभ्येति तथा हं भीष्ममीयिवान्। ६.१०३.२०।)." संजयाच्याच कथनातील कृष्णाच्या अर्जुनाला सांगीत आणि कर्णाच्याच बाबतीतही ही उपमा आली आहे. असौ निवृत्तो राधेयो दृश्यते वानरध्वज। वधाय चात्मनोऽभ्येति दीपपस्य शलभो यथा। (८.४३.४२). हे म्हणण्याआधीच श्लोकांमध्ये कर्णाच्या पराक्रमाचे कृष्णकृत स्तुतिपर वर्णन आहे. उदा. ८.४३.३३ मध्ये म्हटले आहे : "पहा अर्जुना, श्रेष्ठ धनुष्य खेचणारा (कर्ण) कसा शोभतोय! जणू शत्रूंना जिंकून देवांच्या समुदायांनी वेढलेला इंद्रच." (पश्य पार्थ धनुःश्रेष्ठं विकर्षन् साधु शोभते। शत्रून् जित्वा यथा शक्रो देवसंघैः समावृतः। ८.४३.३३)." यामुळे त्याच कृष्णाच्या तोंडी, तीच अग्निपतंगाची उपमा संजयासमोर आली, तशीच वसुदेवासमोर आली तर त्यात सुसंगतीच आहे, "पांडवांच्या बाजूने पक्षपात" वगैरे काही नाही.

अग्नि-पतंगाची उपमा संस्कृत काव्यात वापरून गुळगुळीत झालेली आहे. ती कुणाच्या बाबतीत कुणी वापरली यावरून अवमूल्यन वगैरे काही होत नाही. पुन्हा, ती कवीने काव्याच्या रीतीप्रमाणे काव्यातल्या पात्रांच्या तोंडी घातलेली आहे. त्या पात्रांना इतिहासातल्या व्यक्ती मानून काय योग्य काय अयोग्य याचा निर्णय लेखात केला आहे तसा करणे योग्य नाही. "शत्रूला इतके क्षुद्र लेखणे योग्य नव्हे" हे नीतितत्त्व चांगले आहे, पण महाभारताच्या कवींनी 'क्षुद्र' या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विशेषणाचा वापर दोन्ही पक्षांच्या लहानमोठ्या व्यक्तींच्या संवादात किंवा बोलण्यात भरपूर केल्याचे दिसते. वर दुर्योधनाने धृष्टद्युम्नाला 'क्षुद्र सेनापती' म्हटल्याचे आलेच आहे. अश्वत्थामा त्याला धरून सगळ्यांनाच क्षुद्र म्हणतो : क्षुद्रः पापो वृकोदरः (१०.९.२२). यदुपेक्षितवान् क्षुद्रो धिक् तमस्तु युधिष्ठिरम् (१०.९.२४) एकाकी बहुभिः क्षुद्रैः आहवे शुद्धविक्रमः। पातितो. (१०.१.५७) वृकोदरेण क्षुद्रेण सुनृशंसमिदं कृतम्। (१०.१.५८) हत्वा च समरे क्षुद्रान् पाञ्चालान् पांडुभिः सह। (१०.१०.४१) स हत्वा रावणं क्षुद्रं राक्षसेन्द्रं सुरद्विषम्। (३.२७५.१) ततः सैन्धवको राजा क्षुद्रस्तात जयद्रथः। (७.५१.९) इत्यादी.

### ६. दुर्योधनाचे गदायुद्ध

"संजयाची माहिती सर्वश्रुत आहे. दुर्योधनाचा पाडाव होण्यासाठी भीमाने अधर्माचरण केले हे न सांगता भीमाने पराक्रम करून दुर्योधनाला मारले ह्या कृष्णाच्या वर्णनात 'फार मोठा सत्यापलाप' आहे" असे लेखात म्हटले आहे. कृष्णाने ती माहिती ज्या शब्दांत सांगायला पाहिजे होती त्यांचा संस्कृत चरणही लेखात रचून दिला आहे.

संहितेचे वाचन, संकलन, संशोधन, साहित्यिक समीक्षण, नीतिधर्मपरीक्षण या अनेक अंगांची या विधानांमध्ये सरमिसळ झालेली आहे आणि त्यामुळे शुद्ध संशोधन वाऱ्यावर जाण्याचा धोका निर्माण होत आहे.

एखाद्या वर्णनात सत्यापलाप झाल्याचा आरोप करताना ज्या सत्याशी प्रतारणा झाली असेल ते लेखकाला माहीत असले पाहिजे. येथे संजयाची सर्वश्रुत माहिती हे ते सत्य असल्याचे गृहीत धरले आहे. घटनांच्या संबंधाने पाहिले तर संजयाच्या माहितीतली घटनाच कृष्णाच्याही माहितीत सांगितली आहे. त्या माहितीतला कृष्णाने सल्ला दिल्याचा भाग न आला तरी चालते असे लेखात म्हटले आहे. मग राहिले काय. तर "भीमाने अधर्माचरण केले एवढे तरी म्हणायला हवे होते." आता, ही गोष्ट कृष्णाने या त्रोटक वृत्तांतात सांगण्याची गरज होती का? (हा सगळा वृत्तांतच सांगण्याची गरज होती का – असाही प्रश्न विचारता येईल तो वेगळाच). वैशंपायनाच्या निरूपणानुसार, शिष्टाई विफल झाल्यावर कृष्णाने पांडवांना युद्धाचा सल्ला दिला त्यावेळी बलराम उपस्थित होता आणि हे युद्ध कृष्णाने टाळावे असा त्याचा आग्रह होता. तो कृष्णाने न पाळल्यामुळे बलराम तीर्थयात्रेला निघून गेला तो नेमका नारदाकडून युद्धाची सारी वार्ता ऐकून भीमदुर्योधनांच्या गदायुद्धादिवशीच रणांगणावर होता. भीमाने अधर्माचरण केले ते पाहून आपला नांगर घेऊन तो भीमाच्या अंगावर धावला. त्याला कृष्णानेच बाजूला केले होते आणि भीमाच्या प्रतिज्ञेची आठवण देऊन त्याच्या वागण्याचे समर्थन केले. (५.१५४.३३,३४। ९.३४.१२,९.५३.२०,२२। ९.५३.३०,३१। ९.५९.३,७, ११,१४,१५।). वसुदेवाला 'प्रत्यक्षदर्शी' बलरामाकडून हे आधीच कळले नसेल असे का मानायचे?

भीमाचे अधर्माचरण ही नीतिधर्मविषयक प्रतिक्रिया आहे. महाकाव्यातल्या दोन वृत्तांतांची तुलना करणाऱ्या अभ्यासकाला स्वतःच्या नीतिधर्मांचे मानदंड त्या शब्दरूपांवर लादता येणार नाहीत. कृष्णाने काय म्हटले एवढ्यावर त्याने थांबले पाहिजे. कृष्णाने काय म्हणायला पाहिजे होते हे संशोधन नाही. त्यातून कृष्णाची कोणती वृत्ती व्यक्त होते याचा निर्णय वाचकांनी हवा तर करावा. त्या निर्णयासाठी सामुग्री उपलब्ध करून द्यायची इतकीच भूमिका संशोधकाने निभावली पाहिजे.

संजयाच्या वृत्तांतानुसार, बलरामानेच काय, युधिष्ठिरानेही मांडीवर गदा मारण्याला अधर्म किंवा अन्याय म्हटले होते (अन्यायेन हतं दृष्ट्वा गदायुद्धेन भारत। युधिष्ठिरं महाराज महद् भयमथाविशत्। ९.६२.९। कथं दुःखमिदं तीव्रं गान्धारी प्रसहिष्यति। ९.६२.१२) स्वतः केलेल्या सूचनेचे समर्थन कृष्णाने दोघांनाही तत्कालच दिले होते. तेव्हा सारांशाने युद्धकथा सांगताना त्याने आपल्याच सूचनेला अधर्म म्हणावे ही अपेक्षा चुकीची आहे. शत्रुपक्ष तसे म्हणणार हे









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अपेक्षितच होते. लेखात 'विक्रम्य' ऐवजी 'व्युत्क्रम्य' असा शब्दबदल सुचवला आहे. तो संहितेत वैशंपायन आणि दुर्योधन यांच्या मुखी घातलेलाच आहे (हतं दुर्योधनं दृष्ट्वा गदायुद्धेन भारत। व्युत्क्रम्य समयं राजन् धार्तराष्ट्रं महाबलम्। ९.६२.८। यथाहं भीमसेनेन व्युत्क्रम्य समयं हतः। ९.६३.१०) हे कवीला स्वभावलेखनासाठी स्वाभाविक म्हणावे लागेल. संशोधकाच्या लेखी मात्र ते म्हणणे अप्रस्तुत आहे.

### ७. अभिमन्यूचा पराक्रम

अभिमन्यूविषयी कृष्णाचे कथन म्हणून कवीने रचलेल्या श्लोकांची चिकित्सा युद्धविषयक अधिकृत सरकारी पत्रकाच्या संदर्भाने करावी तशी संजयाच्या कथनाशी करून, लेखात तीनचार टीकाविधाने आहेत त्यांचा परामर्श थोडक्यात घेता येईल.

१. "अभिमन्युवधाची माहिती थोड्या विस्ताराने दिली आहे, तेव्हा त्यात चक्रव्यूहाचा उल्लेख होण्यास हरकत नव्हती." वधाची माहिती थोड्या विस्ताराने येण्याचे कारण काव्यगत आहे. या माहितीतून पुढे सुभद्रेची भोवळ आणि उत्तरेच्या गर्भाचे निधन इत्यादींच्या मार्गे अश्वमेधाच्या तयारीकडे कवीला जायचे आहे. वध कसा झाला याचे कवीला फारसे अगत्य नव्हते.

२. "हजारो, शेकडो भूमिपाल मारले अशी अतिशयोक्ती कृष्णाने करण्याचे कारण नव्हते." हीसुद्धा काव्यातली अतिशयोक्ती आहे, इतिहासातली नाही. अशी अतिशयोक्ती संजयाच्या युद्धवृत्तांतातसुद्धा जागजागी आली आहे. अभिमन्यूविषयी त्यात म्हटले आहे, "स कृत्वा दुष्करं कर्म हत्वा वीरान्सहस्रशः। ७.३२.१९। राजपुत्र शतं तद्वत् सौभद्रेणापतत् हतम्। ७.४४.२७। निहतैः क्षत्रियैः शूरैः नानाजनपदेश्वरैः। जयगृद्धैर्वृता भूमिः दारुणा समपद्यत। ७.४३.१८। बभञ्ज च सहस्राणि दश राजन्महात्मनाम्। ७.४६.२३। इत्यादी. त्यामुळे कृष्णाप्रमाणेच संजयाच्या माहितीतही शेकडो आणि हजारो मारल्याची अतिशयोक्ती केलेलीच आहे. मुळात या तुलना करण्याचेच कारण नव्हते; त्या करताना अभिमन्यूने मारलेल्या वीरांची संदर्भसहित लांबलचक यादी देण्याचे तर मुळीच नव्हते."

३. "संजयाने सांगितलेली हकीकत वाचल्यावर नुसत्या द्रोण व कर्ण या दोघांनी अभिमन्यूला दमवले असे म्हणणे सत्याला सोडून आहे असे निश्चितच वाटते." येथे पुन्हा संजयाच्या वर्णनाला सत्याची परी दिली आहे हे चिकित्सकतेला सोडून झाले. शिवाय संजयाच्या हकीकतीतही "द्रोण आणि कर्ण प्रमुख असलेल्या सहाजणांनी (द्रोणकर्णमुखैः षड्भिः। ७.४८.२१।)" इतका उल्लेख तरी आलाच आहे. त्यामुळे या किरकोळ तपशिलावरून सत्यासत्याचे निवाडे करणे हे फारच झाले.

४. "अभिमन्यूचे कुंतीने श्राद्ध केले असे कृष्णाच्या वर्णनात आहे. संजयाच्या वर्णनात कुंतीचा उल्लेखच नाही, आणि तो नाही हेच बरोबर आहे, कारण युद्धाचे वेळी कुंती शिबिरात नव्हती." अवघ्या महाभारतात कितीतरी आख्याने दोनतीनदा आलेली आहेत. कधीकधी जनमेजयाने किंवा आणखी कोणी 'ती मला पुन्हा सांग (भूयः कथय)' असे म्हणून आधी ऐकलेली गोष्ट पुन्हा ऐकवायला लावलेली आहे. अशा द्विरुक्त आख्यानांच्या तपशिलात लहानमोठे फरक आहेत. याचे एक कारण असे दिसते की, ही आख्याने रचणारे कवी वेगवेगळे असावेत आणि कथेचा सांगाडा कायम ठेवून त्यांनी आपल्या कल्पनेने तिच्यात रंग भरले. तेव्हा कुंती शिबिरात होती का नव्हती याच्या तपशिलात १४ व्या पर्वाच्या कवीला फारसा रस नसल्यामुळे आणि पुढल्या वर्णनावरून दिसते त्यावरून श्राद्धे, तत्संबंधी दाने इत्यादिकांत त्याला जास्त रस असल्यामुळे त्याने तशी रचना केली. संजयाचे वर्णन 'बरोबर' आणि कृष्णाचे चुकीचे असे काहीच म्हणता येणार नाही. संहितेत दोन ठिकाणी ती दोन वर्णने वेगळी आली आहेत इतकेच म्हणता येईल. संशोधनाच्या दृष्टीने ती वेगळी आहेत याला महत्त्व आहे ते, महाभारताचे कर्ते अनेक आहेत हे उघड होण्यापुरते.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

### ८. युद्धानंतर उरले किती

युद्धानंतर पांडवांकडील आणि कौरवांकडील नेमके कितीजण उरले याविषयी लेखात विवेचन आहे.

याविषयी संहितेतल्या इतर उल्लेखांवरून तपासणी केली तर अशा हिशेबांची निरर्थकता पटते. या चौदाव्या पर्वात कृष्णाने वसुदेवाप्रमाणे उत्तङ्क मुनीलाही युद्धाचा वृत्तांत सांगितल्याचे आख्यान आहे. त्यात कृष्ण असे सांगत असल्याचे दाखवले आहे की, "पाण्डव पाच राहिलेत, त्यांचे मित्र आणि पुत्र मारले गेले. आणि कौरव सारेच, मुले आणि बांधव यांच्यासह मारले गेले. (पञ्च वै पाण्डवाः शिष्टा हतमित्रा हतात्मजाः। धार्तराष्ट्राश्च निहताः सर्वे ससुतबान्धवाः। १४.५२.१८।)". कृष्णाने वसुदेवाला मात्र पांडवांचे सात आणि कौरवांचे चार राहिल्याचे सांगितले. याचा अर्थ असा होऊ शकेल की कृष्णाच्या सुद्धा बोलात बोल नाही.

याच प्रकारे पांडवांकडलेही साताच्या जागी आठ उरले होते असे म्हणावे लागेल. हा आठवा धृष्टद्युम्नाचा सारथी. अश्वत्थाम्याने रात्रीच्या वेळी पांडवांच्या शिबिरात जे कंदन केले त्यातून वाचलेला आणि त्याची वार्ता धर्मराजाकडे घेऊन आलेला. ती रात्र संपल्यावर धृष्टद्युम्नाच्या सारथ्याने झोपलेल्यांचे जे कदन केले गेले ते धर्मराजाला सांगितले, "राजा, त्या सैन्यातला मीच एक उरलो. कृतवर्मा व्यग्र असल्यामुळे कसातरी सुटलो. (तस्यां रात्र्यां व्यतीतायां धृष्टद्युम्नस्य सारथिः। शशंस धर्मराजाय सौप्तिके कदनं कृतम्। १०.१०.१। अहमेकोऽवशिष्टस्तु तस्मात् सैन्यात् महीपते। मुक्तः कथंचिद् धर्मात्मन् व्यग्रस्य कृतवर्मनः। १०.१.६।)".

कृष्णाने कौरवांकडे चार उरले असे वसुदेवाला सांगितले, तर अश्वत्थाम्याने ते तीन उरले म्हणून दुर्योधनाला सांगितले. लेखात कौरवांच्या तीन-चारांसंबंधी काढलेला निष्कर्ष असा : "कृष्णाने सांगितले ते *खोटे* नव्हते. युयुत्सूने कौरवांची बाजू सोडली असल्यामुळे त्याला *क्षुल्लक* मानून कौरवांकडील उरलेल्यांत त्याची गणना अश्वत्थाम्याने न करणे, पण कृष्णाने ती करणे हे *समजण्यासारखे* आहे." या अवतरणात येथे तिरपे छापलेले गुण-मूल्य-ज्ञान-वाचक शब्द संशोधकाला वापरता येणार नाहीत.

### ९. सेनादलांची संख्या

महायुद्धानंतर उरलेल्या मूठभर व्यक्तींच्या संख्येबद्दल इतके घोळ, तर अठरा अक्षौहिणी या मुळातच अफाट असलेल्या संख्येच्या सेनादलांतील संख्येबाबत काय पुसावे. "आपणास ह्या आकड्यांचा शब्दशः अर्थ घेण्याचे कारण नाही" अशी (इतर एकूण चर्चेला बाधक ठरू शकणारी) सोडवणूक आधीच करून घेतली असली तरी, लेखात ६, ७, ८ या पर्वांमधले संकीर्ण उल्लेख देऊन बरीच चर्चा केली आहे. ती चर्चा फोल आहे असे स्पष्टपणे म्हणता येईल असा ९ व्या पर्वातला संजय उवाच (९.७.३६-४०) पाहण्यासारखा आहे. "राजा, (शल्य सेनापती झाला तेव्हा) आपले आणि त्यांचे युद्धाला उभे राहिले. तेव्हा संग्रामात किती सैन्य उरले होते ते माझ्याकडून ऐक." असे म्हणून यानंतरच्या चार श्लोकांत संजयाने दिलेली माहिती कोष्टकात अशी मांडता येईल :

| पक्ष | रथ | हत्ती | घोडे | पायदळ |
|---|---|---|---|---|
| कौरव | अकरा ह. | दहा ह.सातशे | दोन लक्ष | तीन कोटी |
| पांडव | सहा ह. | सहा ह. | दहा ह. | दोन कोटी |

(यथा वयं परे राजन् युद्धाय समवस्थिताः। यावच्चासीद् बलं शिष्टं संग्रामे तन्निबोध मे। ३६। एकादश सहस्राणि रथानां भरतर्षभ। दश दन्तिसहस्राणि सप्त चैव शतानि च। ३७। पूर्णे शतसहस्रे द्वे हयानां भरतर्षभ। नरकोट्यस्तथा तिस्रो बलमेतत्तवाभवत्। ३८। रथानां षट्सहस्राणि षट्सहस्राश्च कुंजराः। दश चाश्वसहस्राणि पत्तिकोटी च भारत। ३९। एतद् बलं पाण्डवानामभवत् शेषमाहवे। एत एव समाजग्मुर्युद्धाय भरतर्षभ। ९.७.४०।)

या गणतीवरून युद्धाच्या सोळाव्या








राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दिवशीसुद्धा एकूण पाच कोटी पायदळ रणांगणावर होते असे संजयाचे वृत्त आहे. अठरा अक्षौहिणी म्हणजे सुमारे चाळीस लक्ष होतात त्याच्या साडेबारा पट इतकी ही संख्या मोठी आहे. यांतली कोणतीच संख्या 'खरी, विश्वासार्ह, यथातथ्य, प्रत्यक्षदर्श' अशी काहीच नाही हे ध्यानात ठेवले पाहिजे. लेखातल्या संदर्भांमधल्या संख्यांना हेच विधान लागू पडते. वेगवेगळ्या ठिकाणी, बहुधा वेगवेगळ्या कवींनी आपल्याला वाटल्या त्या संख्या श्लोकात ग्रंथित केल्या हे मान्य करूनच संहितेचे संशोधन पुढे जाऊ शकेल.

### १०. संशोधनाच्या नव्या दिशा

महाभारताच्या संहितेत इतिहास आहे आणि संजयाच्या तोंडी म्हणून जे उल्लेख संहितेत आले आहेत. त्यांत 'खरा' इतिहास आहे या दोन गृहीतांवर लेखाची उभारणी झाली आहे. लेखाला पायाभूत असलेली ही दोन्ही गृहीते मान्य होण्यासारखी नाहीत. महाभारताच्या संहितेतील कथनांना इतिहासमूल्य नाही असे स्पष्ट मत भांडारकर आणि दांडेकर या प्राच्यविद्यापंडितांनी गेल्या शतकात व्यक्त करून ठेवले आहे. संजयाची आणि व्यासांची दिव्यदृष्टी बुद्धिवादी संशोधनात आधाराला घेता येत नाही. चौदाव्या पर्वातल्या उल्लेखांच्या तुलनेसाठी घेतलेले प्रमाण अशा रीतीने अग्राह्य ठरल्यावर त्या पर्वाची स्वतंत्र तपासणी करण्याकडे नवे संशोधन वळवले पाहिजे.

या चौदाव्या पर्वाच्या आरंभी युद्धोत्तर उदकदानादिकांच्यानंतर युधिष्ठिराला वैराग्याचा झटका आल्याचे दाखवले आहे. त्यावर व्यास त्याला अश्वमेध यज्ञ करण्याचा उपदेश करतात आणि पूर्वी मरुत्त राजाने यज्ञात वाटलेले, ब्राह्मणांनी हिमालयात पुरून ठेवलेले सोनेनाणे यज्ञाच्या खर्चासाठी घेऊन यायला सांगतात. मग सर्वजण हस्तिनापुराला येतात. एवढा भाग झाल्यावर पुढे पंधराव्या अध्यायात कृष्ण द्वारकेला जाण्याची इच्छा अर्जुनापुढे प्रकट करतो. त्यावेळी अर्जुन त्याला सांगतो की, युद्धाच्या आरंभी तू जे प्रेमाने सांगितलेस ते माझ्या भ्रष्ट मनातून सारे नाहीसे झाले आहे ते पुन्हा मला सांग. त्यावर रोष व्यक्त करून कृष्ण म्हणतो की मलाही ते पुन्हा सांगणे अशक्य आहे, तरी "इतिहासं तु वक्ष्यामि तस्मिन् अर्थे पुरातनम्। १४.५९.१३। त्या अर्थाचा पुरातन इतिहास एक तुला सांगतो" असे म्हणून स्वर्गलोकातून आलेल्या एका ब्राह्मणाने जे काय सांगितले त्याचा उच्चार करतो. १६ ते ५० अध्यायांमध्ये सांगितलेला हा हरदासी उपदेश (तथाकथित इतिहास) परंपरेने 'अनुगीता' या नावाने प्रसिद्ध आहे. तरी भगवद्गीतेशी त्याचे साम्य नाही आणि आधुनिक अर्थाने इतिहास त्यात अर्थातच नाही. यातल्या अनेक अध्यायांची सुरुवात मात्र "अत्राप्युदाहरन्तीमम् इतिहासं पुरातनम्" या मुद्रेने झाली आहे.

एकावन्नाव्या अध्यायात सुभद्रेला घेऊन द्वारकेला रथातून जायला कृष्ण निघतो. पुढच्या सात अध्यायात त्याला उत्तंक नावाचा तपस्वी ब्राह्मण भेटतो. त्याने विचारल्यावरून कृष्ण त्याला युद्धाचे थोडक्यात वृत्त सांगतो. त्यावर रागावून उत्तंक शाप देतो. कृष्ण त्याला विश्वरूप दाखवून त्याचा नक्षा उतरतो. या उत्तंकाची गुरुभक्तिपर गोष्ट पुढे आहे, ती आदिपर्वात सुरुवातीलाच आलेलीच आहे! त्याचप्रमाणे परशुरामाचीही कथा येथे येते, तीसुद्धा आदिपर्वात आलीच आहे. एवढे झाल्यावर ५९ व्या अध्यायात वसुदेव कृष्णाला विचारतो आणि कृष्ण त्याला युद्धाचा 'यथातथ्य' वृत्तांत सांगतो.

यावरून हे लक्षात येते की, या पर्वाची रचना कोणा कवीने स्वतंत्रपणे करून महाभारताला जोडली आहे आणि ती जोडणी स्वाभाविक वाटावी म्हणून युद्धोत्तर अश्वमेधाशी ती रचना सांगडून टाकली आहे. या पर्वात पांडवांच्या कर्तृकीचा फारसा 'इतिहास' नाही; श्राद्धतर्पणे, दानधर्म यांची रेलचेल आहे. एकंदरीतच सामान्य क्षमतेच्या कवीने ही रचना केल्यासारखी वाटते. पंधरा ते अठरा ही पर्वे आधीच्या पर्वांच्या मानाने खूपच तोकडी आहेत. त्यांचे विषयही आश्रमवास, स्वर्गारोहण यांसारखे (केवळ व्यासांनाच दिसले असतील अशा



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कालातले आणि लोकातले असल्यामुळे) संजय किंवा कृष्ण यांच्यासारख्या कुणाच्या 'प्रत्यक्षदर्शि'त्वाचा हवाला देऊन 'इतिहासा'त समाविष्ट करण्यासारखे नाहीत.

म्हणून १४ व्या पर्वातल्या नावनिशीच्या तपशिलाची तुलना इतर पर्वांमध्ये विखुरलेल्या तपशिलांशी करणे म्हणजे रामायण-महाभारतातल्या कथारूपांची तुलना अठरा पुराणांतल्या कथांशी करण्यासारखे आहे. अशी तुलना पारंपरिक पुराणिकांच्या पठडीतली होते, चिकित्सक बुद्धिवादी संशोधनातली होत नाही. त्या तुलनेत नीतिशास्त्राच्या कसोट्या लावणे दूरान्वयी आहे. सुप्रतिष्ठित संस्थेतल्या अधिकारी अभ्यासकांकडून अशा तुलना केल्या जातात तेव्हा नव्या पिढीतल्या अभ्यासकांपुढे चुकीचे आदर्श उभे राहतात. तसे होऊ नये म्हणून लेखाची ही छाननी केली आहे. प्राच्यविद्येच्या अभ्यासकांनी तिचा खोलवर विचार करून महाभारतसंहितेच्या संशोधनाला नव्या दिशा द्याव्यात.



**प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई**
दुसरी संवर्धित आवृत्ती

**हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन**
**मे.पुं.रेगे**

भारतातील नवसमाजउभारणीचे ध्येय साधण्यासाठी आधारभूत होऊ शकणाऱ्या भारतीय नैतिक-आध्यात्मिक परंपरेचे सुबोध दिग्दर्शन करणाऱ्या ग्रंथाच्या या संवर्धित आवृत्तीत प्रा.शि.स.अंतरकर आणि प्रा.स.ह.देशपांडे यांचे परीक्षण लेख, प्रा.मे.पुं.रेगे यांनी अंतरकर यांच्या परीक्षणाचा घेतलेला परामर्श आणि प्रा.स.ह.देशपांडे यांच्या परीक्षणाचा प्रा. रेगे यांच्या विचारव्यूहाच्या संदर्भात श्री. वसंतराव पळशीकर यांनी केलेला ऊहापोह या नवीन मजकुराचा समावेश आहे. सद्यःस्थितीत अत्यंत प्रस्तुत असलेला हा ग्रंथ आपल्या संग्रही हवाच.

**पृष्ठे २१५** **किंमत रु. १६०/-**

*संपर्क :* **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)**









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# राज्यघटनेत सुधारणा

सुभाष आठले



भारतातील राजकारणात गुन्हेगारांनी मोठ्या प्रमाणावर शिरकाव केला आहे. काही काळापूर्वी झालेल्या उत्तर प्रदेशातील निवडणुकांमध्ये भाग घेतलेल्यांमध्ये व निवडून आलेल्यांमध्ये फौजदारी-बलात्कार, खून, दरोडा, पळवून नेणे अशा-गुन्ह्यांबद्दल आरोपी असलेल्यांचे प्रमाण जवळपास २५% आहे. "यथा राजा तथा प्रजा" या न्यायाने राजकारणाच्या गुन्हेगारीकरणाने पोलीस दलाचे व शासकीय नोकरवर्गाचे गुन्हेगारीकरण ओघानेच होते. आपली संरक्षक दले त्यातून कितपत वाचली आहेत, याबद्दल शंका व तर्कच आहेत. प्रत्येक सजग, सूज्ञ व जबाबदार नागरिकाने चिंता करावी अशीच ही बाब आहे. पण नागरिकांनी फक्त चिंता करून थांबता कामा नये. या रोगावर उपाय शोधण्याचा सर्व ताकदीनिशी प्रयत्न केला पाहिजे.

"लोकांना त्यांच्या लायकीप्रमाणे राज्यकर्ते मिळतात" असे म्हणण्याची प्रथा आहे, पण ते खरे नाही. तसे म्हणणे निराशावादी आहे, व तसे मानल्यामुळे सुधारणेसाठी प्रयत्न करण्याची आपली काही जबाबदारी नाही, असे वाटण्याकडे प्रवृत्ती होते. माझ्या मते भारतीय जनतेला चांगल्या, नीतिमान व्यक्तींनाच निवडून द्यावयाचे असते, पण भारतीय घटनेने जी निवडणूक पद्धत स्वीकारली आहे, त्यामुळे त्यात अडथळा निर्माण होतो. या घटनेने स्वीकारलेल्या प्रतिनिधी निवडीच्या पद्धतीमुळे श्रीमंत, बाहुबली व नीतिची चाड नसलेलेच उमेदवार निवडणुकीत यशस्वी होऊ शकतात. असे उमेदवार स्वतः गुन्हेगारी प्रवृत्तीचे किंवा निदान गुन्हेगारांना सहकार्य करणारे असण्याची शक्यता दाट असते. सत्शील, सज्जन पण लक्ष्मीचा वरदहस्त नसलेले लोक या निवडणुकीच्या हातघाईच्या लढाईत पडू इच्छित नाही, तसे धाडस त्यांनी केले तर त्यांना अपयश येते, आणि चुकून यश मिळाले तरी पुढील कारभारामध्ये त्यांना आपल्या तत्त्वांना मुरड घालावी लागते. साहजिकच, निवडणुकीला उभे असलेले जवळ जवळ सर्व उमेदवार सारखेच (भ्रष्ट, गुन्हेगार) असतात. पर्यायच नसल्याने कित्येक मतदार मतदानच करत नाहीत, तर कित्येक लोक हतबल होऊन धर्म, जात, लाच अशा अन्य निकषांवर मतदान करतात. एकूणच, सध्याच्या निवडणूक पद्धतीमुळे गुणवान उमेदवारांपेक्षा नीचतम उमेदवारांना कायदाकर्ते व राज्यकर्ते म्हणून निवडले जात आहे. यात जनतेचा दोष कमी असून घटनेने निवडलेल्या निवडणूक पद्धतीचा दोष अधिक आहे.

यातून बाहेर पडण्याचा मार्ग म्हणजे घटना-सुधारणा करून निवडणूक पद्धती चांगली निवडणे. त्या दिशेने जाण्यासाठी खाली काही घटना-सुधारणा सुचवत आहे - की ज्यामुळे भारत हे जास्त जगण्यायोग्य राष्ट्र होईल. शक्य आहे की मी फक्त दिवा-स्वप्ने पहात आहे. पण स्वप्ने पाहणे भविष्य घडवण्यासाठी आवश्यक आहे. मला वाटते तुम्ही देखील यात सहभागी व्हाल — फक्त स्वप्ने पहाण्यात नाही तर ती प्रत्यक्षात आणण्यासाठी प्रामाणिक प्रयत्न करण्यात.

**राज्यघटनेत सुधारणा -**

२६ नोव्हेंबर १९४९ रोजी संविधान सभेत भारताची राज्यघटना मंजूर करून स्वीकारण्यात आली. राज्यघटना अनंत काळापर्यंत तशीच अचल रहावी अशी कल्पना कधीच नव्हती. अनेक वर्षांच्या वापरानंतर या घटनेमधील त्रुटी लक्षात येतील, तसेच काळाबरोबर मानवी जीवनात बदल होत जाऊन, घटनेतही त्यानुसार

अनुक्रमणिका

मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बदल करावे लागतील, हे अपेक्षितच होते.

आजतागायत घटनेत अनेक दुरुस्त्या करण्यात आल्या. पण त्यांचे स्वरूप बहुतेक वेळा कायदा करण्यातील घटनात्मक अडचणींमधून मार्ग काढण्याचे – पळवाट तयार करण्याचे होते. आज आपण प्रयत्न करणार आहोत तो अनुभवापासून शिकून, घटनेत सुधारणा करण्याचा आहे. कोणत्याही तत्कालिक अडचणीवर मात करण्यासाठी हा प्रयत्न नाही, तर भारतीय जनमानसाला, जनवर्तनाला अधिक चपखल बसणारी अधिक चांगली घटना निर्माण करण्याचा हा प्रयत्न आहे. म्हणून आपण त्यांना घटना-दुरुस्त्या न म्हणता घटना सुधारणा म्हणत आहोत.

**लोकसभेचे सदस्य निवडण्याची प्रक्रीया**

८१-१-क नुसार लोकसभेचे ५३० सदस्य हे राज्यांमधील क्षेत्रीय मतदार संघांमधून प्रत्यक्ष निवडणुकीद्वारे निवडले जातात.

या प्रत्यक्ष निवडणूक पद्धतीचे तोटे असे आहेत : –

**१) राजकारणाचे गुन्हेगारीकरण** - प्रत्यक्ष निवडणुकीमध्ये उमेदवाराला खूपच खर्च करावा लागतो, शिवाय पाठिंबा देणाऱ्यांची एक फौजच पदरी बाळगावी लागते. याला इंग्रजीत थोडक्यात "मनी अँड मसल पॉवर" असे म्हणतात. म्हणजेच उमेदवाराचा मुख्य गुण म्हणजे श्रीमंती व फौजफाटा. इतर गुण गौण ठरतात. याशिवाय महत्त्वाचा गुण म्हणजे निवडणुकीनंतर आपल्या स्थानाचा उपयोग करून घालवलेला पैसा परत मिळवणे, फौजफाटा पदरी बाळगण्यासाठी पैसा मिळवणे, पक्षाच्या खजिन्यात भर घालण्यासाठी पैसा मिळवणे, पुढच्या निवडणुकीसाठी तरतूद करणे- कदाचित पराभवासाठीदेखील तरतूद करणे आणि एवढा सर्व त्रास सार्थ व्हावा म्हणून पुढील अनेक पिढ्यांची आर्थिक चैनीची तरतूद करणे. या सर्व गुणांमध्ये अर्थातच् बडे गुन्हेगार अगदी फिट्ट बसतात. राजकीय पक्षांचे नेतृत्व याबाबतीत हतबल असते, कारण पक्षाचे भवितव्य पूर्णपणे त्या पक्षाचे उमेदवार निवडून येण्यावरच अवलंबून असते. नैतिकदृष्ट्या चांगला उमेदवार उभा केला व तो पडला तर मग काय उपयोग?

२) प्रत्यक्ष निवडणुकीमुळे अपक्ष उमेदवार किंवा अत्यंत लहान असे प्रादेशिक पक्ष देखील संसदेमध्ये दाखल होतात. बऱ्याच वेळा कोणत्याच पक्षाला बहुमत मिळत नाही. त्यामुळे तत्त्वशून्य आघाड्या निर्माण होतात. खासदारांची खरेदी केली जाते. चार-पाच खासदार असलेले लहान पक्षदेखील सरकार पाडण्याची धमकी देऊन आपली किंमत वसूल करतात.

३) अखिल भारतीय पातळीवर राजकीय पक्षाला निवडणुकीत मिळालेली एकूण मते व त्या पक्षाला मिळालेल्या जागा यांचा संबंध रहात नाही. म्हणजेच मतदारांच्या पसंतीचे प्रतिबिंब पक्षाला मिळालेल्या जागांमध्ये पडत नाही.

४) प्रत्यक्ष निवडणुकांमुळे जातीभेद, प्रांतभेद, भाषाभेद यांना उत्तेजन मिळते. एकाच जागेसाठी अनेक उमेदवार उभे राहिल्यामुळे २५% मते मिळवणारा उमेदवारदेखील निवडून येतो. तो बहुसंख्यांचे प्रतिनिधित्व करू शकत नाही. मतदारांनादेखील आपण मतदान केल्यामुळे काही फरक पडतो असे वाटत नाही. सर्वच उमेदवार सारखेच (गुन्हेगार) असल्याने कोणाला मत द्यावे, कोणालाही निवडून आणावे – असे मतदाराला वाटत नाही. मतदार निरुत्साही होतात, मतदानाचे प्रमाणच कमी होते.

५) या सर्वांमुळे मतदारांना राजकारण्यांबद्दल विश्वास वाटेनासा होतो. त्यामानाने न्यायसंस्था, निवडणूक अधिकारी, मानवी हक्क मंडळ, वेगवेगळी रेग्युलेटरी मंडळे यांवर जनतेचा विश्वास जास्त टिकून आहे. त्याचे कारण असे दिसते की या सर्व संस्थांचे पदाधिकारी निवडलेले असतात-निवडून आलेले नसतात. प्रत्यक्ष निवडणुकांत असे काहीतरी आहे की ज्यामुळे कमी दर्जाची माणसेच निवडली जातात.


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**घटना – सुधारणा – १**

**अप्रत्यक्ष निवडणुका :** वरील सर्व तोटे आपण पाहिले. त्यांवर मात करण्यासाठी अप्रत्यक्ष निवडणुका हा उपाय आहे. त्यासाठी,

**घटना सुधारणा १ :** संसद निवडणुकीसाठी फक्त राजकीय पक्षच उमेदवार असतील. मतदार आपले मत फक्त पक्षाला देईल. सर्व भारतभरात जेवढी मते राजकीय पक्षाला मिळतील, त्याच्या प्रमाणात संसदेत त्या पक्षाला जागा मिळतील. प्रत्येक पक्ष निवडणुकीपूर्वी आपल्या उमेदवारांची यादी प्रसिद्ध करेल. संसदेत मिळालेल्या जागांवर पक्ष आपल्या यादीनुसार अनुक्रमाने आपल्या उमेदवारांची नेमणूक करेल. या संसद सदस्यांपैकी कोणी राजीनामा दिल्यास, किंवा कोणाचा मृत्यू झाल्यास, किंवा कायदेशीर कारणांनी कोणाचे सदस्यत्व रद्द झाल्यास, पक्ष त्या जागेवर यादीप्रमाणे अग्रक्रमानुसार नवीन उमेदवाराची नेमणूक करेल. त्यासाठी बाय–इलेक्शन होणार नाही.

अपक्ष सदस्य असणारच नाहीत. ज्या पक्षाला ६% पेक्षा कमी मते मिळतील, त्याची ५ वर्षांकरता – म्हणजे पुढील निवडणुकीपर्यंत, राष्ट्रीय पक्ष म्हणून मान्यता काढून घेतली जाईल, व त्या पक्षाला एकही जागा मिळणार नाही.

या सुधारणेमुळे राजकीय पक्ष आपल्या महत्त्वाच्या पदाधिकाऱ्यांना व उमेदवारांना निवडू शकतो. १९५२ च्या पहिल्या निवडणुकीत मुरारजी देसाई, बाबासाहेब आंबेडकर, डांगे, अशोक मेहता, जे. बी. कृपलानी, नरेंद्र देव यांच्यासारखे नामवंत उमेदवार पराभूत झाल्याने नामुष्कीचा प्रसंग सर्वांवरच ओढवला. पैकी मुरारजी देसाईंची सोय घटना–दुरुस्ती करून करण्यात आली. या घटनादुरुस्ती अन्वये निवडून न आलेली व्यक्ती मुख्य–मंत्री होऊ शकते–फक्त तिला पुढील सहा महिन्यात निवडून यावे लागते. — आतापर्यंतच्या घटना–दुरुस्त्यांना मी पळवाटा म्हणतो ते यासाठीच. प्रत्यक्ष निवडणुकांच्या रण–धुमाळीस सज्जन माणसे घाबरतात व न घाबरता उभी राहिली तर हमखास पडतात. पक्ष मात्र नक्कीच आपल्या यादीत पक्षाने निवडलेली माणसे ही सज्जनपणात, व अन्य सर्व चांगल्या गुणात, निवडून आलेल्या माणसांपेक्षा सरस ठरतील असे आपण विश्वासाने म्हणू शकतो.

नुकत्याच झालेल्या म्युनिसिपल निवडणुकां-नंतर वृत्तपत्रांत अशी बातमी होती :– "काँग्रेस पार्टी स्कोअर्स बेस्ट, बट लुजेस दी मॅच." म्हणजेच काँग्रेस पार्टीला ज्याप्रमाणात मते मिळाली, त्या प्रमाणात जागा मिळाल्या नाहीत. असे वैगुण्य अप्रत्यक्ष निवडणुकीतील प्रमाणबद्ध प्रतिनिधित्वामुळे उद्‌भवणार नाही. जनमताचे योग्य प्रतिबिंब प्रतिनिधित्वात पडेल. त्यामुळे मतदारांचा देखील उत्साह वाढेल. कारण मग प्रत्येक मताला किंमत येईल. सध्या अयशस्वी उमेदवाराला दिलेली मते वायाच जातात - त्यांचा परिणाम दिसतच नाही.

यादीप्रमाणे उमेदवार निवडला जाणार असल्याने जातीवरून, भाषेवरून, धर्मावरून प्रचारही होणार नाही, व मतेही त्याप्रमाणे दिली जाणार नाहीत. धर्म, जात, भाषाभेद यांना निवडणुकीमुळे खतपाणी घातले जाणार नाही.

गुन्हेगार उमेदवार निवडण्याचे कारण राहणार नाही. गुन्हेगारी जगताची राजकारणावरील पकड ढिली होईल. निवडणुकीत होणारा खर्च कमी होईल, व शासनाकडून पक्षांना निवडणूक–निधी द्यावयाचे ठरल्यास त्याचे गणित करणे सोपे जाईल.

निवडणुका महत्त्वाच्या राजकीय, आर्थिक, सामाजिक मुद्द्यांवर लढवल्या जातील. स्थानिक वाद, दुफळ्या, व घराणेशाही यांचे महत्त्व कमी होईल. कोणत्याही राजकीय पक्षाला अखिल भारतीय स्तरावर पाठिंबा असल्याशिवाय त्याला संसदेमध्ये प्रवेश मिळणार नाही. त्यामुळे निव्वळ प्रांतीय स्वरूप असलेल्या लहान पक्षांमुळे सध्या केंद्रीय राजकारणात जी ब्लॅकमेलींग पद्धतीची किंमत वसुली चालते, ती बंद होऊन केंद्रीय राजकारण अधिक निरोगी बनेल. अधिक जबाबदार व अभ्यासू सदस्य निवडले गेल्यामुळे संसदेतील व्यवहाराची पातळी वर जाईल, कायदे



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

करण्याचे व कार्यकारी विभागावर लक्ष ठेवण्याचे काम अधिक काळजीपूर्वक केले जाईल.

स्त्रियांसाठी संसदेत जागा राखीव ठेवण्यासाठी कायदा करावा लागणार नाही. राजकीय पक्ष आपल्या यादीमध्ये योग्य प्रमाणात स्त्रियांना जागा देतील–किंवा देऊ शकतील.

अशीच अप्रत्यक्ष निवडणूक राज्यस्तरावर, जिल्हा परिषदांमध्ये, स्थानिक स्वराज्य संस्थांमध्ये व पंचायत स्तरावर देखील घेतली जाईल.

एकंदरीतच, सर्वच पातळ्यावरील राजकारणामध्ये व कार्यक्षमतेमध्ये लक्षणीय असा चांगला बदल या निवडणूक विषयी घटना–सुधारणेमुळे होऊ शकेल.

**घटना सुधारणा – २**

**मंत्रिमंडळ विषयक सुधारणा : -**

**२ अ) प्रधान मंत्र्यांची निवड -** प्रधानमंत्री निवडण्याबद्दल राष्ट्रपतींना काही (डिस्क्रीशनरी) अधिकार असणार नाहीत. निवडणुकांनंतर लगेचच संसदेची बैठक बोलवून त्यामध्ये सभापती व प्रधानमंत्री म्हणून संसदेतील सदस्यांची निवड गुप्त मतदानाने केली जाईल. या पहिल्या सभेत राष्ट्राध्यक्ष संसदेचा अध्यक्ष म्हणून (सभापती म्हणून) काम करतील. नंतरच्या सर्व सभांमध्ये सभापती हा संसदेने निवडलेला असेल.

**२ ब) मंत्र्यांची निवड -** प्रधान मंत्री आपल्या मंत्री–मंडळांत मंत्री म्हणून काम करण्यासाठी संसदेचा सदस्य नसणाऱ्या तज्ज्ञ व्यक्तींची निवड करतील. या मंत्र्यांना कधीच निवडून यावे लागणार नाही. त्यांना स्वत:चा मतदार संघ नसल्याने मतदार संघ सांभाळणे, दौरे काढणे, पक्षाचा प्रचार करणे वगैरे जबाबदाऱ्या त्यांच्यावर असणार नाहीत. ते आपापल्या खात्याच्या कामाच्या बाबतीत तज्ज्ञ असतील, व आपला पूर्ण वेळ व ताकद ते आपल्या खात्याच्या कामासाठी वापरू शकतील, व नि:पक्षपातीपणाने कारभार करतील.

**२ क) अविश्वासाचा ठराव -** संसदेला अविश्वासाच्या ठरावाने, बहुमताने, प्रधानमंत्र्यांचा राजीनामा मागता येईल, पण त्याच सभेमध्ये अन्य कोणातरी सदस्यावर विश्वासाचा ठराव मंजूर करून त्याला प्रधानमंत्री बनवावे लागेल. तसे न केल्यास मूळ प्रधानमंत्र्यांवरचा अविश्वास ठराव अवैध ठरेल. या सुधारणेमुळे राष्ट्रपती राजवट आणण्याची किंवा काळजीवाहू सरकार नेमण्याची, आणि मध्यावधी निवडणुकांची गरज संपेल. सतत कोण ना कोण प्रधानमंत्री सत्तेत असेलच.

**घटना सुधारणा - ३ : राष्ट्रीय पोलीस आयोग**

सध्याच्या निवडणूक आयोगाप्रमाणे घटनात्मक स्वायत्त अधिकार असलेला राष्ट्रीय पोलीस आयोग असेल. त्याच्या अधिकाराखाली राज्यवार पोलीस आयोग असतील. पोलीस दलातील अधिकाऱ्यांच्या नेमणुका, बढत्या, निलंबन, बडतर्फी, बदल्या याबद्दलचे निर्णय हे राज्य पोलीस आयोग करतील. त्यांच्यावर देखरेख राष्ट्रीय आयोग करेल. तसेच राज्य–आयोगाच्या निर्णयावर राष्ट्रीय आयोगाकडे अपील करता येईल.

या आयोगामध्ये न्यायखाते, राज्य मंत्रीमंडळ, प्रॉसिक्युटर्स आयोग, बार कौन्सिल, मानवी हक्क आयोग, यांचे प्रतिनिधी सदस्य म्हणून काम करतील.

राष्ट्रीय व राज्य पोलीस आयोगांमुळे गृहमंत्र्यांची पोलीस दलावरील पकड ढिली होईल व दिल्ली, मुंबई व गुजरात येथील हत्याकांडांची पुनरावृत्ती होणार नाही अशी रास्त अपेक्षा बाळगता येईल.

**घटना सुधारणा - ४**

राष्ट्रीय प्रॉसिक्युटर जनरल नावाचे घटनात्मक स्वायत्त दर्जा असलेले पद, व त्याच्या हाताखाली राज्यस्तरीय प्रॉसिक्युटर्स अशी पदे निर्माण करणे. न्यायालयात खटला भरण्यासाठी बळकट पुरावा आहे की नाही, त्यामुळे खटला भरावा की नाही, खटला मागे केव्हा घ्यावा, याचे निर्णय या पदावरील व्यक्ती





अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घेतील. शिवाय कोणत्या खटल्यासाठी कोणता प्रॉसिक्युटर नेमावा, प्रॉसिक्युर्टसच्या नेमणुकी, बढत्या, बदल्या वगैरे निर्णय राज्यस्तरीय प्रॉसिक्युटर जनरल त्यांच्या सल्लागार समितीच्या मदतीने घेतील.

प्रॉसिक्युटर जनरल व त्याची सल्लागार समिती यांची निवड पोलीस आयोग करेल. शासनाच्या प्रतिनिधीला त्यात स्थान असेल, पण ते निर्णायक असणार नाही.

**घटना सुधारणा - ५ : न्यायदान विषयक**

५ अ) बऱ्याच प्रकारचे खटले न्यायालया-बाहेर दोन्ही पक्षांच्या सहमतीने नुकसान भरपाई देऊन मिटवण्याची सोय उपलब्ध करणे. (याला इंग्रजीत "कांपाउंडिंग ऑफ आफेन्स" असे म्हणतात) त्यामुळे खटले लवकर निकालात निघतील, व प्रत्यक्ष न्यायालयांवरचा कामाचा बोजा खूपच कमी होईल.

५ ब) पुरावा कायद्यात बदल करून गुन्हा घडल्यानंतर लवकरच साक्षीदारांच्या साक्षी न्यायालयीन अधिकाऱ्यांसमोर शपथेवर घेऊन नोंदवून ठेवाव्या. प्रत्यक्ष खटला उभा राहण्यास उशीर झाला तरी साक्षीदारांची साक्ष विस्मृती, लाच, धाक यांमुळे विचलीत होणार नाही अशी खात्री त्यामुळे मिळेल, किंवा साक्षीदार नैसर्गिक-अनैसर्गिक कारणांनी खटला सुरू होण्यापूर्वीच मरण्याची शक्यता कमी होईल.

**घटना सुधारणा - ६**

भारतीय संविधानाच्या उद्देशिकेत भारताचे एक सार्वभौम, समाजवादी, धर्मनिरपेक्ष, लोकशाही गणराज्य घडविण्याचा निर्धार व्यक्त केला आहे, व प्रत्येक राजकीय पक्षास निवडणुकीस पात्र होण्यासाठी तशी शपथ घ्यावी लागते.

समाजवाद (सोशॅलिझम) याचा शब्दकोशात अर्थ "वस्तु व सेवा यांचे उत्पादन, विवरण व विनिमय यांच्यावर समाजाची मालकी असणे" असा दिला आहे. व्यक्तीच्या उपक्रमशीलतेवर समाजवादामध्ये बंधने येतात. आपापला उद्योग-व्यवसाय स्वतंत्रपणे करून आपले पोट भरण्याच्या नागरिकांच्या स्वातंत्र्यावर समाजवादामध्ये गदा येते. घटनेला जर हाच अर्थ अभिप्रेत असेल तर त्यामुळे एक मोठे, राष्ट्र-व्यवहार-व्यापी व मूलभूत असे ढोंग निर्माण होत आहे. घटनेला जर "समाजवाद" याचा अन्य काही अर्थ अभिप्रेत असेल तर तसे घटनेत स्पष्ट करून समाजवादाची आपली नवीन व्याख्या घटनेत अंतर्भूत करावी. त्यापेक्षाही उत्तम म्हणजे आपल्याला अभिप्रेत असलेल्या समाज-व्यवस्थेसाठी नवीनच संज्ञा वापरावी. म्हणजे गैरसमज व अर्थाचा घोटाळा होणार नाही.

त्यापेक्षा उत्तम म्हणजे उद्देशिकेतील 'समाजवादी' हा शब्द काढूनच टाकावा. (म्हणजेच बेचाळीसावी घटना दुरुस्ती तेवढ्यापुरती रद्द करावी.) ते अधिक प्रामाणिकपणाचे होईल.

खरे म्हणजे, ४२ व्या घटना दुरुस्तीने घटनेचे मूलभूत स्वरूपच बदलून गेले. असा कायदा किंवा दुरुस्ती करण्याचा संसदेला हक्कच नसल्याने बेचाळीसावी घटना दुरुस्ती रद्दच केली गेली पाहिजे. तसे केल्यास "समाजवादी" हा नंतर घुसवलेला शब्द आपोआपच वगळला जाईल.

**घटना सुधारणा - ७ :**
**स्थायी घटना - सुधारणा - मंडळ**

घटनेचे मूलभूत स्वरूप बदलता येणार नाही, पण काळाबरोबर व अनुभवाने घटनेत अनेक सुधारणा करण्याची आवश्यकता आज भासत आहे, व पुढेही भासणार आहे. सध्या घटनेत सुधारणा करण्यासाठी संसदेत दोन-त्रितियांश बहुमत असावे लागते, व शिवाय राज्यांचीही सहमती लागते. अशा सुधारणा जरी राष्ट्रहिताच्या दृष्टीने आवश्यक असल्या तरी जर त्यांमुळे संसद, विधानमंडळे व मंत्रिमंडळे यांचे हक्क व अधिकार कमी होत असले तर अशा घटना-सुधारणा संसदेमध्ये व राज्यांकडून मंजूर होणे अशक्य किंवा फार अवघड असते.


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

. म्हणून स्वायत्त असे घटना-सुधारणा-मंडळ कायम स्वरूपात कार्यरत असावे. समजा ३३ जणांचे. त्यापैकी ११ जण दर तीन वर्षांनी निवृत्त होतील व नवीन ११ जणांची निवड होईल. निवृत्त न्यायाधीश, निवृत्त प्रॉसिक्युटर्स, नामवंत घटनातज्ज्ञ वकील, तत्त्वज्ञानी विचारवंत यांची या मंडळावर निवड व्हावी. या मंडळाची कामे अशी असतील – १) घटनेत सुधारणा सुचवणे - या मंडळाने सुचवलेल्या सुधारणा संसदेने व राज्यांनी वारंवार अमान्य केल्यास, त्या सार्वमताने मंजूर-नामंजूर करण्याची सोय असावी. २) संसदेनें केलेल्या कायद्यांचे ठरावीक कालावधीनंतर मूल्यमापन करणे. कायद्यांची प्रत्यक्षात अंमलबजावणी झाली का? अंमलबजावणी झाली असल्यास त्यामुळे फायदे-तोटे काय झाले? ज्या कायद्यांची अंमलबजावणीच होऊ शकली नाही, व ज्यांच्यामुळे मूळ उद्दिष्ट साध्य होण्याऐवजी तोटेच जास्त झाले - असे कायदे रद्द करण्याची शिफारस करणे. ३) न्याय-पीठाचा अवमान संसदेची बेअदबी, खासदारांनी फायद्याचे पद धारण करणे अशा चक्रावून टाकणाऱ्या प्रश्नांबद्दल त्रयस्थ म्हणून योग्य व निश्चित असे नियम तयार करणे. कारण अशा प्रकरणी निर्णय घेणाऱ्या व्यक्ती व निर्णयामुळे ज्यांना फायदा होतो, किंवा ज्यांचे हक्क वाढतात, अशा व्यक्ती एकच असणे योग्य नाही. न्यायाधीश हा स्वतः वादी किंवा प्रतिवादी असणे योग्य नाही. संसद सदस्यांनी स्वतःच कायदा मंजूर करून आपला पगार व इतर लाभ (पर्क्स) वाढवणे, स्वतःच लाभाच्या पदाची नवीन व्याख्या करणे योग्य नाही. म्हणून अशी कामे "स्वायत्त घटना-सुधारणा मंडळाकडे सोपवावी."

वरील विवेचनाप्रमाणे,

१) अप्रत्यक्ष प्रमाणशीर निवडणुका.

२) प्रधानमंत्री निवडीचे काम नवीन निवडून आलेले सदस्य संसदेच्या पहिल्या सभेतच पार पाडतील.

३) प्रधान मंत्र्यांना संसदेचे सदस्य नसलेल्या व्यक्तींना मंत्री म्हणून नेमण्याचा अधिकार असेल.

४) प्रधान मंत्र्यांवर संसदेने अविश्वास ठराव मंजूर केल्यास, संसदेला त्याच सभेत नवीन प्रधानमंत्री निवडावा लागेल.

५) राष्ट्रीय पोलीस आयोगाची स्थापना.

६) स्वायत्त प्रॉसिक्युटर जनरलची स्थापना.

७) "नुकसान भरपाई किंवा दंड देऊन न्यायालयाबाहेर खटले मिटवणे, पुरावा कायद्यातील बदल, अशा न्यायदान विषयक सुधारणा."

८) घटनेतील 'समाजवादी' हा शब्द गाळून टाकणे.

९) स्वायत्त व स्थायी असे घटना-सुधारणा मंडळ निर्माण करणे.

अशा ९ घटनासुधारणा केल्यास राजकारण सुधारेल, 'राजधर्म' (Governance) देखील सुधारेल.







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# काल, आज आणि उद्या

## लिंगभेद : शारीरिक व सांस्कृतिक

साक्षी



गेल्या शतकातील साठीच्या दशकापासून स्त्रीवादी विचारवंतांनी जीवशास्त्रीय लिंग (सेक्स) (याला आपण 'शालिंग' म्हणू) आणि सांस्कृतिक संदर्भात होणारा लिंगाचा उल्लेख (जेन्डर) (याला आपण 'सालिंग' म्हणू) यांच्यात फरक करण्यास सुरुवात केली. शालिंग व सालिंग यांच्यात केलेल्या फरकातून लिंगभेदाला केवळ जीवशास्त्रीय आधारच नव्हे तर सांस्कृतिक संदर्भही आहे, हे अधोरेखित होते हा फायदा आहे. 'वेगळी शारीरिक ठेवण असणारी व्यक्ती' इतक्यापुरताच स्त्रीपुरुषात फरक आहे याची आठवण 'शालिंग' हा शब्द देतो. पण अलिकडील काही स्त्रीवादी असे मानतात की, 'स्त्री' बद्दलचा सांस्कृतिक विचार वगळून जर तिचा केवळ 'शालिंगा'च्या बाजूने विचार केला तर तिचे लिंग हे फक्त एक सत्त्व (इसेन्स) होऊन राहते. स्त्री-पुरुष संबंधात शालिंग हा महत्त्वाचा घटक आहे आणि तो तसा घटक असण्यामुळेच शालिंगाच्या पायावर सालिंगाची उभारणी होऊ शकली, इकडे दुर्लक्ष होते.

ज्या परिस्थितीत स्त्रीवाद्यांनी शालिंग/सालिंग हा फरक करण्यास सुरुवात केली त्या वैचारिक परिस्थितीचा मागोवा घेतला पाहिजे. या काळी एक लिंगभेदाधारित विचारगुंफण (सेक्शुअल आयडि-यॉलॉजी) समाजाच्या विचारांवर पगडा ठेवून होती. या गुंफणीची दोन अंगे होती. पहिले असे की, स्त्रीपुरुषात लिंगभेद तर आहेच. पण तो केवळ शारीर नाही. त्या भेदाप्रमाणे त्या त्या (म्हणजे पुरुष किंवा स्त्री) व्यक्तीची जीवनशैली ठरत असते. व्यक्तीच्या क्षमता, आकांक्षा, कार्यक्षेत्रे, पोषाख, भाषा, हावभाव या प्रत्येकातून पुरुषत्व किंवा स्त्रीत्व अनुभवाला येते. हा जो विचार आहे त्याला स्त्रीवादी विचारक 'लिंगाची सर्वोपस्थिती' (पर्व्हेझिव्ह पिक्चर ऑफ सेक्स) असे नाव देतात. या विचारगुंफणीचे दुसरे अंग असे मानते की, स्त्री व पुरुष यांच्या जीवनशैलीतील व त्यांच्या समाजातील स्थानात असणारा हा जो फरक आहे तो त्यांच्या लिंगातील फरकामुळे पडलेला व त्यामुळे अटळ असा आहे. या विचाराला स्त्रीवादी विचारवंत 'जीवशास्त्रीय निर्धारणवाद' (बायॉलॉजिकल डिटरमिनिझम) असे नाव देतात. या विचारगुंफणीमुळे जी सामाजिक परिस्थिती निर्माण झाली ती स्त्रियांना जाचक व गुदमरवून टाकणारी वाटू लागली; व तिचा प्रतिवाद करताना स्त्रीवाद्यांनी शालिंग/सालिंग हा भेद प्रचारात आणला.

या प्रतिवादाचे मूलसूत्र असे होते की, स्त्री ही पहिल्यांदा मनुष्य आहे व त्याच बरोबर ती मनुष्य जातीतील मादी (फीमेल) आहे. स्त्रीपुरुषातील लिंगभेद मान्य करुनही हे नाकारता येत नाही की, स्त्रियांना ज्यात कर्तृत्व गाजवावेसे वाटते असे क्षेत्र, त्यांच्या क्षमता व आकांक्षा यांच्याशी लिंगभेदाचा काही संबंध असत नाही व असण्याचे कारण नाही. इतिहासकाळात व वेगवेगळ्या सिद्धान्तांच्या चौकटीत 'स्त्रीत्व' या शब्दाला निरनिराळे अर्थ व आयाम प्राप्त झाले; सध्याच्या समाजात स्त्रीच्या बाबतीत जी बंधने व रूढी आणि रिवाज सांगितले जातात त्यांचा खुलासा होण्यासाठी या अर्थांचा व आयामांचा आढावा घेणे उपयुक्त ठरते. मात्र हा आढावा घेताना ही जाणीव ठेवणे गरजेचे आहे की, स्त्रीच्या ज्या काही मर्यादा इतिहासाच्या वेगवेगळ्या टप्प्यांवर सांगितल्या गेल्या त्या मर्यादा ओलांडून बाहेर पडण्याची जिद्द स्त्रीने त्या त्या काळी दाखविली होती.

हे सर्व मान्य करूनही हे ध्यानात ठेवणे आवश्यक आहे की, स्त्री-पुरुष हा भेद विसरुन स्त्रीला 'एक मनुष्य' म्हणून वागणूक मिळावी असा


अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई







सरधोपटपणा करणेही समंजसपणाचे होणार नाही. प्रत्येक मनुष्य निखळ मनुष्य म्हणून कधीच आपल्याला आढळत नाही; कोणत्या ना कोणत्या प्रसंगाच्या कोंदणातूनच आपल्याला तो दिसतो. तीच गोष्ट स्त्रीची आहे. तिचे स्त्रीपण प्रसंगोपात्त आपल्या व तिच्याही अनुभवाला येते व हे प्रसंगांच्या कोंदणातून अनुभवाला आलेले स्त्रीत्वाचे प्रत्यय एकत्र गुंफून आपणाला स्त्री म्हणजे काय हे समजावून घ्यावे लागते. शालिंग/सालिंग भेद विचारांच्या सोयींसाठी केला तरी शालिंगापलिकडे-सुद्धा स्त्रीला स्त्री म्हणून वावरावे लागणार आहे हे भान स्त्रीवाद्यांनी ठेवले पाहिजे.

– १ –

'लाकर' या अभ्यासकाचे म्हणणे आहे की, प्राचीन काळापासून ते मध्ययुगाच्या अखेरीपर्यंत स्त्रीची शरीररचना पुरुषाच्या शरीररचनेपेक्षा काही मूलभूत रीतीने निराळी आहे, असे शरीररचनाशास्त्रवेत्ते मानत नसत. त्यांचे म्हणणे असे होते की, स्त्री–पुरुषांना एकास--एक याच पद्धतीने अवयव आहेत; फक्त त्यांची रचना निराळी केली आहे. योनी व शिश्न हे एकाच प्रकारचे अवयव आहेत. योनी ओटीपोटाच्या आत गेलेली असते तर शिश्न ओटीपोटाच्या बाहेर दिसते. शिश्नाच्या एका टोकाला पण ओटीपोटाच्या बाहेरच वृषण असते तर योनीच्या एका टोकाला पण ओटीपोटाच्या आत गर्भाशय असतो. सारांश, स्त्री–पुरुषांची जननेंद्रिये एकाच स्वरूपाची आहेत. फक्त त्यांच्या ठेवणीत फरक आहे. स्त्री–पुरुषांच्या शरीर–रचनेबद्दलची ही जी विचारसरणी होती तिला लाकर 'एक–लिंग–प्रारूप' (वन–सेक्स–मॉडेल) असे नाव देतो. ही विचार–सरणी जेव्हा प्रचलित होती त्याही काळात समाजात स्त्रीचे स्थान पुरुषापेक्षा खालच्या पायरीवरचेच होते. पण त्याचा खुलासा लिंगभेदाच्या आधाराने न करता ईश्वराची योजनाच तशी आहे, असे सांगून केला जाई. शालिंग/सालिंग या भाषेत बोलायचे तर 'शालिंग' ही गोष्टच जाणिवेचा व शास्त्राचा भाग नव्हती; आणि सालिंग हे ईश्वरदत्त होते.

यानंतरच्या दोन–तीन दशकात पाश्चात्त्य समाजाने क्रमा–क्रमाने 'एक–लिंग–प्रारूप' सोडून 'दोन--लिंग–प्रारूपा'कडे वाटचाल केली. या नव्या प्रारूपाची मांडणी वॉल्टर हीप नावाच्या इंग्रज वैद्याने १९१३ साली केली. (याचा अर्थ असा नव्हे की हे प्रारूप तेव्हापासून प्रचलित झाले.) हीपने असे सांगितले की, स्त्री–पुरुषांची जननेंद्रिये केवळ रचनेनेच वेगळी आहेत असे नाही; तर त्यांची कार्येही पूर्णपणे वेगळी आहेत. तसेच स्त्रीपुरुषांच्या शरीरातील मज्जासंस्था, श्वसनसंस्था, पचनसंस्था इत्यादी संस्था जरी एकाच प्रकारच्या असल्या तरी जनन–संस्थेचा परिणाम या संस्थांवरही होत असतो. स्त्रीच्या अंडकोशातून व पुरुषाच्या वृषणातून निरनिराळ्या प्रकारांचे द्रव पाझरतात व त्यांनी शरीरातील प्रत्येक पेशी ओतप्रोत भरलेला असतो. त्यामुळे प्रत्येक व्यक्ती आपापल्या 'लिंगा'ने पुरी संपृक्त (सॅच्युरेट) होऊन जाते. सारांश, लिंगभेद हा केवळ जननेंद्रियांपुरताच मर्यादित नाही. तो शरीराला वेढून राहिला आहे. अशा रीतीने वैद्यकशास्त्राच्या आधाराने शालिंगाला मूर्तरूप मिळाले.

विचारांच्या क्षितिजावर शालिंगाचा याप्रकारे उदय झाल्यावर प्रथम 'लिंगाची सर्वोपस्थिती' हा विचार पुढे आला. आपण पाहिले की, शालिंगाची जी घटना वैद्यकाने केली तीमध्येच असे म्हटले होते की, लिंग हे केवळ जननेंद्रिये व जननक्रिया यांच्यापुरतेच नाही. शरीराचा पेशीन् पेशी लिंग–प्रभावित असतो. बरे, ही लिंगभावना व्यक्तींच्या शरीरापुरतीच अडकून राहात नाही. त्या व्यक्तीच्या वागणुकीतून, भाषेतून, कार्यातून, पोषाखातून त्या व्यक्तीचे लिंग व्यक्त होत राहाते. घरकाम, बालसंगोपन, समर्पणाची भावना वगैरे गोष्टी स्त्रीसुलभ आहेत तर शौर्य, पराक्रम, संशोधन, तत्त्वज्ञान ही पुरुषाची क्षेत्रे आहेत. प्रत्येक कार्यावर, सवयींवर, हावभाव व हालचालींवर 'हे स्त्रीचे' व 'हे पुरुषाचे' असे छाप पडले. 'एक–लिंग–प्रारूप' सोडून 'दोन–लिंग–प्रारूपा'च्या छायेत पाश्चात्त्य समाज स्थिरावला तेव्हा स्त्री व पुरुष हे एकाच मनुष्यजातीतील दोन भाग राहिले

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाहीत; त्या दोन प्राणिजाती (स्पिसीज्) आहेत, असे मानले जाऊ लागले.

लिंगभेद हा स्त्री-पुरुषांच्या वर्तणुकीच्या प्रत्येक बाबतीत दिसून येतो अशी लिंग-भेदाची सर्वोपस्थिती मान्य झाल्यानंतर नर आणि पुरुष, मादी आणि स्त्री, शालिंग आणि सालिंग हे भेद राहातच नाहीत. पुरुष हा 'नर' म्हणूनच वागायचा व स्त्रीने 'मादी' म्हणूनच त्याला प्रतिसाद द्यायचा, हे ठरूनच जाते. पण आपण हे लक्षात घेतले पाहिजे की, 'सालिंगा'च्या सर्वोपस्थितीचा आग्रह धरला तरी परिस्थिती काही बदलणार नाही. 'दोन-लिंग-प्रारूपा'च्या अंमलाखाली. लिंगभेदाविषयक जी विचारगुंफण (आयडियॉलॉजी) होती तीनुसार स्त्रियांची समाजातील उतरंडीतील खालची अवस्था ही शरीरविज्ञान व जीवशास्त्र यांच्या आधाराने ठरून गेली होती. आधुनिक स्त्रीवादी निसर्ग आणि सामाजिक मानके (नॉर्म्स) यांच्यातील संबंधांचा सखोल विचार करतात. त्याचे कारण वरील विचारगुंफणीचा त्यांना प्रतिवाद करायचा असतो, हे आहे. तथापि, सालिंगाला मध्यवर्ती ठेवून ज्या विचारगुंफणी तयार होतील त्यांच्यामुळे स्त्रियांचा काही उद्धार होईल असे नाही. या विचारगुंफणीतून असेही निष्पन्न होऊ शकेल की, स्त्रियांच्या सद्यःस्थितीवर इलाज नाही, कारण ती ईश्वराचीच योजना आहे; किंवा स्त्रीने कायमच बंडखोर राहायला हवे, कारण स्त्रीच्या समाजातील स्थानाविषयी वाटाघाटच होऊ शकत नाही. शालिंगाला किंवा सालिंगाला, कोणालाही सर्वोपस्थितीचे सामर्थ्य आपण दिले तर स्त्रीच्या (व प्रसंगोपात्त पुरुषाच्याही) लिंगाला अवाजवी महत्त्व येणे अटळ आहे.

**— २ —**

लिंगभेदाची सर्वोपस्थिती या कल्पनेला विरोध करण्यासाठी शालिंग/सालिंग हा भेद स्त्रीवाद्यांनी प्रचारात आणला. तथापि लिंगविषयक विचारप्रणालींची जी गुंफण प्रचलित होती तीत, मागे सांगितल्याप्रमाणे 'जीवशास्त्रीय निर्धारण' हाही एक विचार होता. स्त्रियांचे अधिकार, कर्तव्ये आणि क्षमता यांच्या बाबतीतले निर्णय विज्ञानाच्या आधारे घेता येतील असे 'जीवशास्त्रीय निर्धारण' मानणाऱ्या अनेक विचारवंतांचे मत होते. तथापि १९ व्या शतकातील जीवशास्त्र व शरीरशास्त्र यांची प्रगती अशा वेगाने व इतक्या परस्परविरोधी दिशांनी होत होती की, 'शरीर' या संज्ञेचा वैज्ञानिक अर्थ काय आणि जीवशास्त्रीय तथ्यांचे सामाजिक व्यवहारांच्या क्षेत्रात कसे उपयोजन करावे याचा उलगडा विचारवंतांना होत नव्हता. लाकर लिहितो, " 'शरीर' या संज्ञेला काहीही अर्थ देता येत होता आणि त्यामुळेच त्या संज्ञेला काहीच अर्थ नाही असेही म्हणता येत होते." ते काही असो; 'शरीर' या संज्ञेला काही तरी निश्चित अर्थ देता येणे शक्य आहे इतके जेव्हा मान्य झाले तेव्हा स्त्रिया, समलिंगी आकर्षण वाटणाऱ्या व्यक्ती व इतर त्या प्रत्येक अर्थाला हरकती घेण्यास व समाजात शरीर-भेदास फारसे महत्त्व नाही, असे म्हणण्यास मोकळ्या झाल्या. 'सालिंग' ही संकल्पना स्त्रीवादी विचारवंतांनी पुढे केली ती जीवशास्त्रीय लिंगभेदाचे नेमके महत्त्व जोखण्यासाठी. लिंगभेदाची सर्वोपस्थिती या विचाराला 'सालिंग' ही संकल्पना आव्हान देणारी होती.

जीव-शास्त्रीय निर्धारणवादी लिंगभेदाच्या सर्वोपस्थितीचा विचार सोडून द्यायला तयार नव्हते. ब्रुक्स नावाचा मनुष्य जीवशास्त्राचा नामवंत प्राध्यापक होता. त्याने १८८३ मध्ये लिहिले होते, "वरच्या दर्जाचे जे प्राणी आहेत त्यातील नरांमध्ये एका पिढीतून दुसऱ्या पिढीत मोठ्या प्रमाणावर बदल होतात असे आढळते. माद्यांमध्ये तसे बदल (व्हेरिएबिलिटी) आढळत नाहीत." याचे कारण असे की, स्त्रीच्या अंडकोशाचे काम आनुवंशिकता सांभाळणे हे असते तर पुरुषांचे शुक्रजंतू उपार्जित गुणधर्म (ॲक्वायर्ड कॅरॅक्टरिस्टिक्स) अपत्याकडे संक्रमित करतात. अपत्यात उतरलेले नरतत्त्व हे नवीन गुणधर्मांचे उत्पादन करण्याला सहाय्यक असते तर मादीतत्त्व हे आनुवंशिक गुणधर्मांचे जतन करते. नर अपत्यात, साहजिकच, नरतत्त्व प्रभावी असते तर मादी अपत्यात मादीतत्त्व प्रभावी असते. या





राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

फरकामुळे पुरुषामध्ये नवीन शोध लावणे, उच्च दर्जाची कलाकृती निर्माण करणे, थोर तात्त्विक विचारात रमणे अशा वृत्ती प्रामुख्याने आढळतात. उलट स्त्रियांची वृत्ती ही दैनंदिन, प्रचलित, परिचित आणि सामान्य अशा व्यवहारात रस घेण्याकडे असते. सारांश, जिथे फारसे डोके न खाजविता पण उपयोगी व्यवस्था लावता येते अशा गोष्टी स्त्रियांकडे सोपवाव्या. स्त्रिया जुन्याचे जतन करतात, पुरुष नवीन शोध लावतात; स्त्रीचे अंडे 'जुने ते राखावे' असा कल असणारे तर पुरुषाचे शुक्रजंतू 'नवे ते करावे' अशा हिरीरीचे असतात. या सर्व प्रतिपादनाचा निष्कर्ष असा की, "समाजात स्त्रियांचे जे स्थान आहे व त्यांची जी कामे ठरवून दिली आहेत ती, आमचे प्रतिपादन बरोबर असले तर, योग्यच आहेत. स्त्री-पुरुषांच्या बुद्धिमत्तेत जो फरक आहे तो नाकारून अगर पुसून टाकून स्त्रियांच्या स्थितीत काही बदल करणे हे समाजाला विघातक होईल."

गेड्डेस आणि थॉम्सन या दोघा स्कॉटिश संशोधकांनी १८८९ मध्ये 'दि इव्होल्यूशन ऑफ सेक्स' नावाचे पुस्तक लिहिले. या दोघांनी मनुष्याच्या शरीरातील चयापचयाचा (मेटॅबॉलिझम्) विचार केला होता. शरीरात होणाऱ्या रासायनिक प्रक्रियांचे 'चय' म्हणजे शरीरातील द्रव्ये एकत्र करून अधिक गुंतागुंतीची द्रव्ये बनविणारी प्रक्रिया (अॅनबोलिझम) आणि 'अपचय' म्हणजे गुंतागुंतीच्या द्रव्यातील घटक वेगळे करणारी प्रक्रिया (कॅटॅबोलिझम) असे दोन वर्ग पडतात. गेड्डेस व थॉम्सन यांच्या अभ्यासांप्रमाणे स्त्रियांमध्ये चयाची क्रिया अधिक प्रमाणात होते तर पुरुषांमध्ये अपचयाची क्रिया जास्त प्रमाणात होते. पुरुषांमध्ये ऊर्जेचा अपव्यय होतो तर स्त्रियांमध्ये ऊर्जेची साठवण जास्त होते. परिणाम असा होतो की, पुरुषांमध्ये बदल घडवून आणण्याकडे प्रवृत्ती असते तर स्त्रिया स्थितिशील असतात. सारांश, ब्रुक्सच्या निष्कर्षाला चयापचयाच्या अभ्यासातून पाठिंबाच मिळत होता. स्त्रियांच्या आणि पुरुषांच्या शरीरांची घटनाच अशी आहे की, त्यांच्यामधील शारीरिक व मानसिक फरक नाहीसे करता येत नाहीत. उत्क्रांतीत त्यांची घडणच वेगळ्या पद्धतीची झाली आहे. प्राक्-इतिहासातील घडामोडींनी जे ठरले ते कायदे करून बदलता येणार नाही! स्त्रियांनी पुरुषांबरोबर आर्थिक स्पर्धेत उतरणे हे समाजाचा विनाश घडवून आणणारे ठरेल.

जीवशास्त्रीय निर्धारणवादाचे हे एकोणिसाव्या शतकातील प्रारूप होते. लिंगभेदाच्या सर्वोपस्थितीचा निर्धारणवादाला आधार होता व समाजातील मानके (म्हणजे स्त्रियांचे पुरुषांच्या सापेक्ष नीच स्थान) या निर्धारणवादानुसार योग्यच ठरत होती. स्त्री जे काही करील ते तिच्यातील अंडकोशाला साजेल असेच असणार. त्यामुळे नर(शालिंग) आणि पुरुष (सालिंग) किंवा मादी (शालिंग) आणि स्त्री (सालिंग) यात फरक करण्याला काही आधारच नाही.

— ३ —

'लिंग भेदाची सर्वोपस्थिती' आणि 'जीवशास्त्रीय निर्धारण' या दोन प्रवाहांनी जी 'लिंगाधारित विचारगुंफण' बनली तिचे स्थूल विवेचन आतापर्यंत झाले. शालिंग/सालिंग असा फरक करून १९६० व १९७० यांच्या दशकात स्त्रीवाद्यांनी या विचारगुंफणीचा कसा मुकाबला केला त्याचा आढावा घ्यायचा आहे.

आपण अशा बातम्या अधून-मधून ऐकतो की, स्त्री म्हणून जन्माला आलेल्या व्यक्तीला तिची मानसिकता लक्षात घेऊन शस्त्रक्रिया करून पुरुष बनविण्यात आले किंवा, उलटे, पुरुष व्यक्तीला स्त्री बनविण्यात आले. हे असे का घडते? मानसशास्त्रज्ञ सांगतात की, ती स्त्री/पुरुष व्यक्ती 'चुकून' वेगळ्याच शरीरात अडकून पडली होती. (आता, या विरुद्ध, असे का म्हटले जात नाही की, त्या व्यक्तीने चुकून वेगळीच मानसिकता उपार्जित केली होती?) शरीर व मानसिकता यांच्यातील हा चुकीचा मेळ व्यवस्थित मांडता यावा, यासाठी मानसशास्त्रज्ञांनी (सेक्स) शालिंग/(जेन्डर) सालिंग हे शब्द प्रचारात आणले. चुकीचा मेळ कशात आहे? तर शालिंग व सालिंग यांच्यात आहे. अशी

अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मांडणी केल्यावर 'विजोड लिंगा' चा प्रश्न व त्यांचे उत्तर दृष्टिपथात आले. 'विजोड लिंगा'ने आजारलेल्या व्यक्तीचे शरीर शस्त्रक्रियेने व हॉर्मोनचे उपचार करून बदलायचे आणि शालिंग व सालिंग यांना सजोड करावयाचे. 'स्वतःची सालिंग' ओळख' म्हणजे काय? तर 'मी नर आहे' किंवा 'मी मादी आहे' अशा स्वरुपात स्वतःचे आकलन करून घ्यायचे. म्हणजेच शालिंगाचे भान स्वतःला आणवणे यालाच 'स्वतःची 'सालिंग' ओळख' पटणे, असे म्हणावयाचे.

रॉबर्ट स्टॉलर या मनोवैज्ञानिकाने शालिंग/सालिंग भेदाचे प्रथम निरूपण केले ते असे. शालिंगासाठी योग्य अशा संज्ञा नर/मादी या आहेत तर सालिंगासाठी उपयोगी संज्ञा पुरुष/स्त्री या आहेत. पुरुष व स्त्री हे शब्द शारीर लिंगापासून स्वतंत्र आहेत. 'स्वतःची सालिंग ओळख' पटणे म्हणजे आपण एका विशिष्ट शालिंगाचे आहोत याची कळत किंवा नकळत जाणीव/भान येणे होय. व्यक्ती जसजशी प्रौढ होते तसतशी ही जाणीव अधिक गुंतागुंतीची होत जाते. व्यक्तीला कळू लागते की, आपण केवळ नर नाही तर पुंपुरुष आहोत किंवा बायकी पुरुष आहोत किंवा पुरुष असलो तरी स्त्रीत्वाची आकांक्षा बाळगणारे पुरुष आहोत, वगैरे. 'सालिंग भूमिका' म्हणजे इतर व्यक्तींच्या सान्निध्यात असताना आपल्या सालिंगाची इतरांना खात्री पटविण्यासाठी व्यक्ती जे वर्तन करते, ते होय. (उदा. लहानपणी इतरांच्यात वावरताना काही मुलगे उगीचच दंडाचे स्नायू फुगवून दाखवितात.)

स्टॉलरच्या विवेचनातील 'सालिंग भूमिका' ही संज्ञा वगळता 'सालिंग', 'शालिंग' आणि 'सालिंग ओळख' या संज्ञा स्त्रीवाद्यांनी उचलल्या. समाजातील ज्या रूढी, चालीरीती व व्यवहार यांच्यामुळे स्त्रीवर जुलूम होतो (किंवा व्यक्तीच्या ज्या मनोवृत्तींमुळे स्त्रीवर अन्याय घडतो) अशा सगळ्यांना गेल रुबिन या विचारवंतीने, आपल्या १९७५ सालच्या लेखात, 'शालिंग/सालिंग वर्तनक्रम' असे नाव दिले. रुबिनचे म्हणणे असे होते की, 'सालिंग' याचा मूलभूत अर्थच स्त्रियांवर जुलूम करणाऱ्या सामाजिक रूढी असा केला पाहिजे. या ठिकाणी आपल्याला जीवशास्त्रीय निर्धारणवादाचा प्रथमतःच खणखणीत प्रतिवाद केल्याचे आढळते. शालिंग म्हणजे स्त्री–पुरुषांच्या शरीरातील फरक होय. पण या फरकाचा उपयोग करून स्त्रीचा छळ करणारी जी सामाजिक मानके (नॉर्म्स) अंमलात आली त्यांना सालिंग म्हणावे. 'सालिंग' हेच स्त्रियांच्या छळाचे, अवमानाचे कारण आहे; सालिंग–भेदाला कायमच स्त्रियांवरील छळाची जोड राहिली आहे. रुबिनने शालिंग/सालिंग हे शब्दप्रयोग स्त्रीवादी भूमिका मांडण्यासाठी वापरले व त्याचा परिणाम अमेरिकेतील स्त्रीवादी विचारांवर झाला. कॅथेरीन मॅककिनन या (अमेरिकन) स्त्रीवादिनीचे म्हणणे आहे की, "समाजातील काही व्यक्तींच्या लिंगाचे (सेक्शुॲलिटी) पद्धतशीर अपहरण करून इतरांनी स्वतःसाठी त्याचा उपयोग करून घेतल्याने जे निष्पन्न झाले, त्याला 'स्त्री' म्हणून ओळखले जाते. अशी प्रमेये मांडल्याने स्त्रीवादी विचारवंतांना 'लिंगभेदाधारित विचारगुंफण' आणि स्त्रियांची अवहेलना करणारे विचार यांचा मुकाबला करता आला खरा, पण ही प्रमेये दोन बाबतीत थिटी पडतात. पहिली गोष्ट म्हणजे सालिंगाच्या चौकटीपुढे जे स्त्रीचे आकलन होते व स्त्रीची छळणूक होते त्याच्याशी स्त्रीच्या शालिंगाचा कोणता संबंध आहे? दुसरी गोष्ट, स्त्री व पुरुष यांच्यातील व्यक्तिगत विषयीभावा (सब्जेक्टिव्हिटी)त शालिंगामुळे कसा फरक पडतो, हे शालिंग/सालिंग भेदावर अवलंबून राहाणाऱ्या स्त्रीवादी सिद्धान्तातून पुरेसे व पुरेशा सूक्ष्मतेने स्पष्ट होत नाही.

या आक्षेपाला रुबिन हिने असे उत्तर दिले आहे की, निखळ व निर्विकल्प शालिंग मुली आपल्या अनुभवाला कधीच येतच नाही. मनुष्याचे लैंगिक संबंध नेहमीच काही ना काही सामाजिक संकेतांनी बांधले गेलेले आहेत. लैंगिक वागणूक पूर्णपणे नैसर्गिक स्तरावर, माणसांच्या बाबतीत, कधी राहिलीच नाही. स्त्रीव्यक्ती व पुरुषव्यक्ती एकमेकांना भेटतात त्या कायमच 'शालिंग/सालिंग वर्तनक्रमांच्या सावलीखाली.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कोणतेही आवरण ज्याला नाही असे रोकडे, नैसर्गिक निर्विकल्पक लिंग अथवा लिंगभावना कधी अनुभवाला येतच नाही. त्यामुळे केवळ व निर्विकल्पक शालिंगाचा विचार करण्यात हशील नाही.'

– ४ –

शालिंग/सालिंग भेदावर जो स्त्रीवाद १९६० व ७० च्या दशकात स्त्रीवादिर्नीनी मांडला त्याला संरचनोत्तरवादी (पोस्ट-स्ट्रक्चरॅलिस्ट) विचारवंतांनी काही हरकती घेतल्या. त्यातली मुख्य हरकत होती ती अशी की, शालिंग/सालिंग भेदाच्या आधारे स्त्रीच्या अवहेलनेचे विवेचन करताना शालिंग या बाबीला कमीत कमी अवसर देण्याकडे स्त्रीवाद्यांचा कल असतो. यामुळे लिंग व (लिगांकित) शरीर यांच्या बाबतींतील माणसाचे आकलन काळाच्या क्रमणेत कसे बदलत गेले याचा सर्वांगीण विचार होत नाही. शालिंग/सालिंग भेदावर आधारित स्त्रीवादाला आणखीही एक मर्यादा आहे. ज्या संस्कृतीत शालिंग/सालिंग भेद महत्त्वपूर्ण भाषेत करता येतो अशा संस्कृतीतच स्त्रियांची जी अवहेलना/अवमान होतो तिचा खुलासा अशा स्त्रीवादाने करता येतो. शालिंग/सालिंग या भेदाप्रमाणेच इतर ही अनेक द्वंद्वे, उदा. निसर्ग/संस्कृती, निसर्ग/इतिहास, इ. अशा संस्कृतीत प्रस्थापित झालेली असतात व त्यामुळेच शालिंग/सालिंग हा भेद अशा संस्कृतीत अर्थपूर्णरित्या करता येतो.

संरचनोत्तरवाद्यांचे आक्षेप बाजूला ठेवले तरी महत्त्वाचा आक्षेप उरतो तो असा की, शालिंग/सालिंग भेदात अडकून पडल्याने 'स्त्री' या संकल्पनेचे समग्र आकलन होत नाही. स्त्री ही केवळ मादी नाही किंवा केवळ सालिंगातून ती प्रकट होते असे नाही. या दोन्हीच्या पलिकडे जाऊन ती एक मनुष्य व्यक्ती आहे. मनुष्य व्यक्तीचे आकलन होण्यासाठी/तिची समजूत पटण्यासाठी वय, वर्ग, वंश, राष्ट्र, अनुभव इ. जे अवांतर आयाम आहेत ते स्त्रीला लागू पडतातच. या प्रत्येक आयामाच्या संदर्भात त्या व्यक्तीचे शालिंग कोणती भूमिका बजावते हे पाहणे देखील समग्र अभ्यासाच्या दृष्टीने उपयोगी आहे. शालिंग/सालिंग यांच्या चिमट्यात पकडून स्त्रीकडे पाहाणे किंवा तिच्यावरील जुलुमाचा अभ्यास करणे यात आपण अभावितपणे प्राङ्नयनाचा (रिडक्शन) वापर करीत असतो.

(आधारित)



वैदिक, संस्कृत भाषाशास्त्र, महाभारत – रामायण – भगवद्‌गीता, संस्कृत वाङ्मय यांचे गाढे अभ्यासक व रसिक समीक्षक

**प्राच्यविद्यापंडित डॉ.म.अ.मेहेंदळेकृत**

**प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती**

**निवडक मौलिक लेखांचा संग्रह**

***प्रा.मे.पुं. रेगे यांच्या विवेचक प्रस्तावनेसह***

**डेमी आकाराची ३८ + ५१६ पृष्ठे, पुठ्ठा बांधणी**

**किंमत : रु. ५५०/-**

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५, गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा)






**ग्रंथात समाविष्ट असलेले**
**पं. खुपेरकरशास्त्री यांचे लेख**

- भारतीय दर्शनांचा विकास
- महार्थमंजरी परिचय
- अनुभवामृतातील हरिहरेंद्रांच्या राष्ट्रभाष्याचा स्वल्प परिचय
- नाथपंथीय नामदेव
- श्रीज्ञानेश्वर आणि समर्थ यांचा अजातवाद
- श्रीज्ञानेश्वरीतील अपपाठांचे संशोधन
- दिव्यामृत-धारा - परीक्षण
- शांतरससमीक्षा
- स्फोट-शब्द-विचार
- श्रीमध्वाचार्य व श्री समर्थ यांचा संप्रदाय
- 'पूर्णप्रज्ञदर्शनम्' भाषांतराचे प्रास्ताविक
- 'श्रीवात्स्यायनमुनिप्रणीतं कामसूत्रम्' भाषांतराचे प्रास्ताविक व ग्रंथपरिचय
- कौटलीय अर्थशास्त्र - परीक्षण
- मुनिप्रवर पतंजली
- श्रीजयतीर्थ विजय
- श्रीराघवेंद्रतीर्थ स्वामीमहाराज
- कै. अण्णासाहेब विजापूरकर
- 'श्रीकरवीरमाहात्म्या'चा उपोद्‌घात
- 'श्रीरामगीते'ची प्रस्तावना
- महाकवी मोरोपंत यांच्या हस्तलिखितांची कहाणी
- डॉ. दफ्तरींनी केलेले उपनिषदांचे 'मंथन'
- महाराष्ट्र भाषेचे व्याकरण - परीक्षण
- मराठीतील भावे प्रयोग
- लोकमान्य सेवासंघ, पार्ले - कविता

**पं. खुपेरकरशास्त्री लिखित स्वतंत्र ग्रंथ**

१. श्रीशैवागम आणि ज्ञानेश्वर. शिक्षण प्रसारक मंडळी, १९६०. पृष्ठे १२२
२. श्रीज्ञानेश्वर वाङ्मयाचा सांगोपांग अभ्यास. पुणे विद्यापीठ, १९६३. पृष्ठे ११६
३. श्रीज्ञानेश्वरांच्या वाङ्मयाभ्यासाचे दिग्दर्शन. मुंबई मराठी संशोधन मंडळ, १९६१. पृष्ठे ६०
४. मुकुंद गणेश मिरजकर ऊर्फ कवि मुकुंदराय यांचा अल्पपरिचय. पृष्ठे ८
५. वात्स्यायनांच्या कामसूत्रांचे मराठी भाषांतर (याची प्रत माझ्याकडे आहे - दे.दा.)



पंडित खुपेरकरशास्त्रींचे वरील लेख ज्यांना हवे असतील त्यांनी श्री. अशोक पुरोहित यांच्याशी संपर्क साधावा.

**श्री. अशोक पुरोहित**
१९४३, सदाशिव पेठ,
माडीवाले कॉलनी, पुणे ३०.
दूरध्वनी क्र. (०२०) २४४७२५८७

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

सुधारित किंमत
२० नोव्हेंबर २००६
पासून लागू

| | |
|---|---|
| ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु. |
| ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु. |
| ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु. |
| ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु. |
| ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ | ६० रु. |
| ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु. |
| ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे | २० रु. |
| ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी | १५० रु. |
| ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट | ६० रु. |
| ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले | ५० रु. |
| ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे | ४० रु. |
| ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले | १३० रु. |
| ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील | १५० रु. |
| ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु. |
| ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी | १४० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु. |
| ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य | ५० रु. |
| ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु. |
| ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी | ६० रु. |
| ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर | ३० रु. |
| ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर | १०० रु. |
| ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. बेडेकर | ३० रु. |
| ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार | १०० रु. |
| ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार | १५० रु. |
| ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे | १२० रु. |
| ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा | २०० रु. |
| ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु. |
| ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु. |
| ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे | ४० रु. |
| ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु. |
| ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु. |
| ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु. |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)


हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई